# मुण्डकोपनिषद्

अथर्ववेदातील - 31 उपनिषदापैकी एक मुण्डकोपनिषद्. मुण्डन हे संन्यासाचे चिन्ह असल्याने संन्यासधर्माचा पुरस्कार करणारे उपनिषद म्हणून या उपनिषदाला संन्यासोपनिषद असेही म्हटले जाते. तर दुसऱ्या व्युत्पत्तीनुसार देहाचा सर्वाधिक महत्त्वाचा अवयव असलेले मुण्ड अथवा मुण्डक म्हणजे मस्तक, उत्तमाङ्ग यावरून हे नाव पडले असावे. ब्रह्मविद्येची ओळख पटवून देणारे सर्वांत महत्त्वाचे उपनिषद,

उप+नि+सद् धातू याचे वेगवेगळे अर्थ आहेत जसे जाणे, म्लान होणे, शक्तीहीन होणे.

उपनिषदाचा सोपा अर्थ आहे गुरूच्या जवळ जाऊन बसणे. आणि मोठा अर्थ असा की परब्रह्माची प्राप्ती होत असता आपल्यातील अविद्येचा विनाश.

ह्या उपनिषदाचे 3 भाग म्हणजे 3 मुंडक, प्रत्येक मुंडकाचे दोन दोन खण्ड, आणि एकूण 64 मंत्र आहेत. गीता म्हणजे सुद्धा ब्रह्मविद्या च. श्रीमद्भगवद्गीतेला सुद्धा ब्रह्मविद्या देणारे उपनिषद् असे म्हटले आहे.

**ॐ ब्रह्मा देवानां प्रथमः सम्बभूव विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता। स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठामथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह ॥1. 1.1।।**

विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता ब्रह्मा देवानां प्रथमः सम्बभूव सः सर्वविद्याप्रतिष्ठां ब्रह्मविद्यां ज्येष्ठपुत्राय अथर्वाय प्राह ॥

विश्वस्य विश्व नपु. ष. ए. व.

कर्ता कृ धातू तृच् प्रत्यय विश्वनिर्मिती करणारा

भुवनस्य त्रिभुवनाचा भुवन नपु. ष. ए. व.

गोप्ता संरक्षक गुप् धातू रक्षण करणे तृच प्रत्यय

ब्रह्मा ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

देवानां देव पु. ष. ब. व.

प्रथमः प्रथम पु. प्र. ए. व.

सम्बभूव झालेला सम+भू धातू होणे कर्तरि परोक्ष भूतकाळ लिट लकार प्र. पु. ए. व.

सः तद् पु. प्र. ए. व.

सर्वविद्याप्रतिष्ठां सर्व विद्यांची प्रतिस्थापना सर्वविद्याप्रतिष्ठा स्त्री. द्वि. ए. व. (ब्रह्मविद्याचे विशेषण)

ब्रह्मविद्यां ब्रह्मविद्या स्त्री. द्वि. ए. व.

ज्येष्ठपुत्राय ज्येष्ठपुत्र पु. च. ए. व.

अथर्वाय अथर्व पु. च. ए. व.

द्वि कर्मक धातू असता पुरूष वाचक कर्माची चतुर्थी. वस्तू वाचक कर्माची द्वि.

प्राह बोलता झाला प्रकर्षेण आह ब्रू धातू बोलणे

प्र+आह कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

ह्या मंत्राची सुरुवात ॐ ह्या अक्षराने झाली आहे.

ओंकारश्चाथ शब्दश्च द्वावेतौ ब्रम्हणः पुरा ।

कंठं भित्वा विनिर्यातौ तेन माड गि लकावुभौ ।।

ॐ आणि अथ हे दोन शब्द सर्वप्रथम ब्रह्माच्या तोंडून बाहेर पडले म्हणून हे दोन्ही शब्द स्वभावतः मंगलकारक आहेत.

ज्ञानेश्वर माउलींनी ॐकार द्वारा सगुण व निर्गुण परब्रम्हाचे एकत्र मंगलाचरण केले आहे.

कोणत्याही गोष्टीचे खरे स्वरूप समजून घ्यायचे असेल तर त्याचा उगम आणि परंपरा ह्याची माहिती असायला हवी. ब्रह्मविद्येची निर्मिती आणि त्याचा प्रसार कसा झाला हे सांगणारा हा श्लोक. भगवान विष्णूंच्या नाभीतून सर्वात प्रथम ब्रह्मदेव प्रकट झाले. ब्रह्माने सांगितलेली विद्या ती ब्रह्मविद्या. ब्रह्मविद्या ही सर्व विद्यांचे उगमस्थान, सर्व विद्यांचे आश्रयभूत. स्वतः ब्रह्मांपासून निर्माण झालेली ही विद्या महापुरुषांनी अतिशय परीश्रमपूर्वक प्राप्त केली. ह्या मंत्रात ब्रह्माचे वर्णन सर्व विश्वाचे रचयिता

आणि त्रिभुवनाचे रक्षक असे केले आहे. ब्रह्मांनी निर्माण केलेल्या ह्या विद्येचा त्यांनी आपले जेष्ठ पुत्र अथर्व ह्यास उपदेश केला.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

देवांमधील सर्वप्रथम, सृष्टीचे कर्ते, सर्व विश्वाचे संरक्षक, ब्रह्मदेव, यांनी सर्व विद्यांची आश्रयभूत अशी ब्रह्मविद्या आपले जेष्ठ पुत्र अथर्व ह्यास सांगितली.

---

**अथर्वणे यां प्रवदेत ब्रह्माऽथर्वा तां पुरोवाचाङ्गिरे ब्रह्मविद्याम्।। स भारद्वाजाय सत्यवाहय प्राह भारद्वाजोऽङ्गिरसे परावराम॥ 1.1.2**

अथर्वणे ब्रह्मा यां प्रवदेत तां ब्रह्मविद्याम् अथर्वा पुरा अङ्गिरे उवाच सः भारद्वाजाय सत्यविहाय प्राह। भारद्वाजः परवरां अङ्गिरसे प्राह

अथर्वणे अथर्वास अथर्वन् पु. च. ए. व.

ब्रह्मा ब्रह्मदेव ब्रह्मन् पु. प्र. ए. व.

यां जी यद् स्त्री . द्वि. ए. व.

प्रवदेत म्हणाले प्र+अवदत वद् धातू बोलणे

तां ती तद् स्त्री द्वि. ए. व.

ब्रह्मविद्याम् ब्रह्मविद्या स्त्री. द्वि . ए. व.

अथर्वा अथर्व पु. प्र. ए. व.

पुरा पूर्वी अव्यय

अङ्गिरे अङ्गिर पु. च. ए. व.

उवाच सांगितली ब्रू धातू कर्तरि लिट लकार प्र. पु. ए. व.

सः तद् पु. प्र. ए. व.

भारद्वाजाय भारद्वाज पु. च. ए. व.

सत्यविहाय सत्यविह पु. च. ए. व.

प्राह प्र+आह् धातू बोलणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

भारद्वाजः भारद्वाज पु. प्र. ए. व.

परवरां उत्कृष्ट कनिष्ठ पर अवर स्त्री. द्वि. ए. व.

परा च अवरा च

परेण अवरम्

अङ्गिरसे अङ्गिरस् पु. च. ए. व.

प्राह प्र+आह् धातू बोलणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या मंत्रात सर्व विद्यांची प्रतिस्थापना ब्रह्मविद्येपासून झाली, जी स्वतः ब्रह्मा पासून निर्माण झाली. ही विद्या त्यांनी आपले जेष्ठ पुत्र अथर्व ह्यास सांगितली हे आपण वाचले. आता ह्या मंत्रात अपरा आणि परा म्हणजेच कनिष्ठ आणि श्रेष्ठ विद्यांचा उल्लेख केला आहे. श्रीमद्भगवद्गीतेच्या 7 व्या अध्यायातील 4 थ्या श्लोकात अष्टधा, म्हणजे पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार या प्राकृत शक्तितत्त्वांबद्दल वाचायला मिळते. यांना अपरा शक्ती असे संबोधले आहे. ह्या शिवाय माझी परा शक्ती सुद्धा आहे असे खुद्द श्रीभगवानकृष्ण 7व्या अध्यायातील 5 व्या श्लोकात म्हणतात.

ह्या श्लोकात भारद्वाज, अंगिरा आणि सत्यवाह यांचा उल्लेख केलेला आहे.

भारद्वाज हे सात महान ऋषींपैकी एक, बृहस्पतिंचे पुत्र, द्रोणाचार्यांचे पिता. त्यांनी व्याकरण, आयुर्वेदासहित धनुर्वेद, राजनीतिशास्त्र, यंत्रसर्वस्व, अर्थशास्त्र, पुराण, शिक्षा इत्यादी विषयांवर आधारित अनेक ग्रंथ लिहिले. ते शिक्षाशास्त्री, राजतंत्र मर्मज्ञ, अर्थशास्त्री, शस्त्रविद्या विशारद, आयुर्वेद विशारद, विधि वेत्ता, अभियांत्रिकी विशेषज्ञ, विज्ञान व्यक्ता व मंत्रद्रष्टा होते. भारद्वाज ऋषी हे विमान शास्त्रामध्ये निपुण होते, त्यांनी विमानाचे प्रकार जसे प्रवासी विमान, लष्करी विमान, अंतराळ यान वर्णन केले आहे. चरक संहिता नुसार त्यांनी इंद्राकडून आयुर्वेदाचे ज्ञान प्राप्त केले होते. भारद्वाज हे गोत्र सुद्धा आहे. मुद्गल पुराण तसेच गणेश पुराण या ग्रंथांत दिलेल्या कथांनुसार, अंगिरा किंवा मंगळ हा ऋषी भारद्वाज यांचे पुत्र होत. सत्यवाह हे भारद्वाज गोत्रातील एक सदस्य.

ह्या मंत्राचा अर्थ असा की

जी विद्या ब्रह्मदेवाने अथर्वला शिकवली ती त्याने प्राचीन काळी अंगिर यांस शिकवली, तीच त्याने भारद्वाजकुलोत्पन्न सत्यवाह याला शिकवली, सत्यवाहने अंगिरस् याला शिकवली.

---

**शौनको ह वै महाशालोऽङ्गिरसं विधिवदुपसन्नः पप्रच्छ। कस्मिन् नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति ॥1.1.3।।**

महाशालः शौनकः ह वै विधिवत् उपसन्नः अङ्गिरसं पप्रच्छ नु भगवो कस्मिन् विज्ञाते सर्वम् इदं विज्ञातं भवति इति ॥

महाशालः महाशाल पु. प्र. ए. व.

शौनकः शौनक पु. प्र. ए. व.

ह वै खरोखर

विधिवत् विधिपूर्वक

उपसन्नः उपासना उप + सद् + क्त

गुरोः उपसत्तिः (उप + सद् + क्तिन्)

अङ्गिरसं अङ्गिरस् पु. द्वि. ए. व.

पप्रच्छ प्रच्छ् धातू कर्तरि लिट् लकारः प्र. पु. ए. व.

नु अव्यय नौति नुदति वा नुद् धातू प्रेरणा देणे

भगवो हे भगवान

कस्मिन किम् नपु. स. ए. व.

विज्ञाते जाणल्याने विज्ञात नपु. स. ए. व.

सर्वं सर्व नपु. प्र. ए. व.

इदं हे नपु. प्र. ए. व.

विज्ञातं विज्ञात नपु. द्वि. ए. व.

भवति भू धातू कर्तरि लट् लकार प्र. पु. ए. व.

इति असे अव्यय

पहिल्या मंत्रामधे सर्व विद्यांची प्रतिस्थापना ब्रह्मविद्येत झाली आहे असे आपण वाचले. त्याचाच संदर्भ घेऊन या मंत्राचा अर्थ लावायला हवा. शंकरभाष्यामधे मध्यदीपिकान्याय म्हणजेच देहलीदीप न्यायाचा ह्या मंत्राच्या विवेचनात उल्लेख केला आहे.

महर्षी शौनक यांनी महर्षी अंगिरस ह्यांना या मंत्रात प्रश्न विचारला आहे. आधीच्या श्लोकात सत्यवाह ने अंगिरसाला ब्रह्मविद्या शिकवली हे आपण वाचले. आता महर्षी शौनक अंगिरसाकडून विद्या शिकणार आहेत. दिव्याच्या प्रकाशाचा अंधकार दूर करण्याच्या कार्याचे अज्ञान दूर करण्याच्या कार्याला नेहमीच उपमा दिली जाते. देहलीदीप न्यायाचा अर्थ अंतर्बाह्य ज्ञानाची प्रकाशज्योत असा लावता येईल. पुराणकथा नुसार महर्षी शौनक भृगुवंशी शुनक ऋषींचे पुत्र, त्यांचे पूर्ण नाव  इंद्रोतदैवाय शौनक.

ऋष्यानुक्रमणी ग्रंथानुसार, शौनक ऋषि अंगिरस्गोत्रीय शनुहोत्र ऋषींचे पुत्र, परंतु नंतर भृगु-गोत्रीय शनुकांनी त्यांना आपले पुत्र मानले म्हणून त्यांना शौनक असे नाव मिळाले. अशा रीतीने अंगिरस आणि शौनक यांच्यामध्ये गुरूशिष्यांचे नाते निर्माण झाले. आतापर्यंत वारसा हक्काने पुढे जाणारी ब्रह्मविद्या भृगु-गोत्रीय ऋषींकडे आली. श्रीमद्भगवद्गीतेच्या 4 थ्या अध्यायातील 34 व्या श्लोकात गुरूची सेवा करून ज्ञान प्राप्त करणे क्रमप्राप्त आहे असे सांगितले आहेच. तसेच 13 व्या अध्यायातील 8-12 श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी ज्ञान म्हणजे काय ते स्पष्ट केले आहे. शौनक ऋषींनी ऋक्प्रातिशाख्य, ऋग्वेद छंदानुक्रमणी, ऋग्वेद ऋष्यानुक्रमणी, ऋग्वेद अनुवाकानुक्रमणी, ऋग्वेद सूक्तानुक्रमणी, ऋग्वेद कथानुक्रमणी, ऋग्वेद पादविधान, बृहदेवता, शौनक स्मृति, चरणव्यूह, ऋग्विधान इत्यादी ग्रंथ लिहिले. तसेच शौनक गृहसूत्र, शौनक गृह्यपरिशिष्ट, अशा ग्रंथांची रचना केली होती. शौनक ऋषी आणि ऋषी पिप्पलाद यांचे संवाद ब्रह्मोपनिषदात वाचावयास मिळतात.

महर्षी शौनकांनी जवळपास 10 हज़ार विद्यार्थ्यांसाठी  गुरुकुल स्थापन करून अध्ययनाचे कार्य केले म्हणून त्यांना कुलापती मानले जात असे. असा विलक्षण  सन्मान प्राप्त करणारे ते पहिले ऋषी होते. ह्या मंत्रातील विधीवत् शब्द, शिक्षणाचे औपचारिक स्वरूप दर्शवितो. गुरू कडून ज्ञान संपादन करण्याचे काही नियम

प्रस्थापित झालेले दिसतात. जसे ज्ञानाप्रती तीव्र जिज्ञासा. गुरूंकडे जाताना समिधा घेऊन जाण्याची पद्धत होती.

देहलीदीप न्यायाचा संबंध नृसिंह अवताराची पण जोडता येईल. जेव्हा आपल्या मधे हिरण्यकश्यपू संचारले त्यावेळी प्रल्हादाचे म्हणजेच नृसिंहांचे स्मरण करावे. एकमेव इन्द्रिय म्हणजे आपली जीभ  सुद्धा म्हणजे अन्न ग्रहण आणि जप असे दुहेरी कार्य करते.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

महान गृहस्थधर्मी शौनक, अंगिरा ऋषींकडे आले आणि त्यांनी विधीवत प्रश्न केला, हे गुरो, जे जाणल्यावर सर्व काही ज्ञात होते, असे ते काय आहे?

---

**तस्मै स होवाच - - द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद् ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापरा च ॥1.1.4।।**

सः तस्मै उवाच ह द्वे विद्ये वेदितव्ये इति ह ब्रह्मविदः वदन्ति स्म यद् परा च अपरा च एव

सः ते तद् पु. प्र. ए. व.

तस्मै त्याला तद् पु. च. ए. व.

ह

उवाच म्हणाले ब्रू धातू कर्तरि लिट लकार प्र. पु. ए. व.

द्वे दोन द्वि स्त्री. द्वि. व.

विद्ये विद्या स्त्री द्वि. द्वि. व.

वेदितव्ये जाणून घेण्यासारख्या वेदितव्या स्त्री द्वि. द्वि. व. विद् धातू  तव्यत् प्रत्यय

इति असे अव्यय

ह

ब्रह्मविदः ब्रह्म जाणणारे

वदन्ति स्म म्हणतात वद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

यद् जे

परा श्रेष्ठ स्त्री. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अपरा कनिष्ठ अ+परा स्त्री. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

एव सुद्धा अव्यय

प्रत्येक गोष्टीला दोन बाजू असतात जसे नाण्याच्या दोन बाजू आहेत. दोन्ही बाजू समजावून, शिकवण्याची पद्धत फारशी दिसत नाही. जी अतिशय उपयुक्त आहे. माणसाने चांगले वागावे असे नुसते सांगून चालत नाही. वाईट वागणूक कशी असते ते पण सांगावे लागते. ह्या श्लोकाचे विवेचन करताना शंकरभाष्यामधे अंगिरसांच्या ह्या शैलीचा गौरव केला आहे. शौनकाने फक्त जाणून घेण्यायोग्य अशी कोणती विद्या आहे असे विचारले होते त्यावर अंगिरसांनी दोन विद्यांचा उल्लेख केला. एक परा म्हणजे श्रेष्ठ आणि दुसरी अपरा म्हणजे कनिष्ठ.

गुरू नेहमीच आपल्या शिष्याची योग्यता ओळखून त्याच्या पुढचे ज्ञान देतात. ह्या श्लोकाचा गर्भित अर्थ असाही घेता येईल की शौनक ऋषींचा हा अगदीच सुरवातीचा काळ असावा. (आधीच्या श्लोकात शौनक ऋषींचा कर्तृत्व आलेख विस्ताराने सांगितला आहे.)

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

त्याला (शौनकाला) ते (अंगिरस) म्हणाले प्राप्त करून घेण्याजोग्या दोन प्रकारच्या विद्या आहेत. त्या म्हणजे परा आणि अपरा असे ब्रह्मवेत्ते (उपनिषदांचे द्रष्टे म्हणतात.

---

**तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति।**

**अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥1.1.5**

तत्र अपरा ऋग्वेदः यजुर्वेदः सामवेदः अथर्ववेदः शिक्षा कल्पः व्याकरणं निरुक्तम् छंदः ज्योतिषम् इति। अथ परा यया तत् अक्षरम् अधिगम्यते ॥

तत्र तेथे तद्+त्रल् प्रत्यय अव्यय

अपरा कनिष्ठ अ+परा स्त्री. प्र. ए. व.

ऋग्वेदः ऋग्वेद पु. प्र. ए. व.

यजुर्वेदः यजुर्वेद पु. प्र. ए. व.

सामवेदः सामवेद पु. प्र. ए. व.

अथर्ववेदः अथर्ववेद पु. प्र. ए. व.

शिक्षा शिक्षा स्त्री. प्र. ए. व.

कल्पः कल्प पु. प्र. ए. व.

व्याकरणं व्याकरण नपु. प्र. ए. व.

निरुक्तम् निरुक्तं नपु. प्र. ए. व.

छंदः छंद पु. प्र. ए. व.

ज्योतिषम् ज्योतिष नपु. प्र. ए. व.

इति असे अव्यय

अथ आता अव्यय

परा श्रेष्ठ परा स्त्री. प्र. ए. व.

यया जिच्यायोगे यद् स्त्री. तृ. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

अक्षरम् अविनाशी अक्षर नपु. प्र. ए. व.

अधिगम्यते जाणले जाते अधि+गम् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

आधीच्या मंत्रात दोन प्रकारच्या विद्या आहेत असे सांगून झाल्यावर त्या दोन्ही चे स्पष्टीकरण ह्या मंत्रात सांगितले आहे.

आपले 4 वेद ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्ववेदः तसेच 6 वेदांग शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, ज्योतिष, तसेच नक्षत्र, वास्तु, आयुर्वेद, कर्मकांड ह्या सर्वांना अपरा विद्या असे म्हटले आहे.

6 वेदांगांची माहिती पुढिलप्रमाणे.

शिक्षा-वेदमंत्रांचे उच्चारण शुद्ध व अचूक होण्याच्या दृष्टीने ध्वनिशास्त्राचा अभ्यास करून रचण्यात आलेल्या शास्त्रांना 'शिक्षा' असे म्हणतात. काही प्राचीन शिक्षा-ग्रंथांना प्रातिशाख्ये असे म्हटले जाते.

कल्प- ह्या मध्ये श्रौतसूत्रे, शुल्बसूत्रे, गृहयसूत्रे आणि धर्मसूत्रे हयांचा समावेश होतो. संहिता व ब्राहमणग्रंथ हयांतील यज्ञसंस्थेचे सांगोपांग स्वरूप व्यवस्थित, एकत्र आणि विषयवारीने उपलब्ध करण्यासाठी श्रौतसूत्रे निर्माण झाली. यज्ञकुंड, यज्ञवेदी, यज्ञमंडप तयार करताना घ्यावयाच्या मोजमापांचे गणित शुल्बसूत्रांत सांगितलेले असते. भारतीय भूमितीचे प्राथमिक स्वरूप शुल्बसूत्रांत दिसते. गृहयसूत्रांत नामकरण, उपनयन, विवाह इ. सोळा संस्कार तसेच श्राद्धे हयांचे विधी सांगितले आहेत. आश्वलायन, शाखायन, बौधायन, आपस्तंब, पारस्कर, गोभिल, कौशिक इ. १७ गृहयसूत्रे आज उपलब्ध आहेत. धर्मसूत्रांत आश्रमधर्म व लौकिक आचारधर्म म्हणजे कायदे व राजधर्म सांगितले आहेत.

व्याकरण- पाणिनीचे व्याकरण आपण सर्व जाणतोच. संधीविच्छेद करण्याचे नियम सूत्रात बांधलेले असल्याने संस्कृत भाषा प्रान्तवार बदलत नाही. वेदमंत्रांतील शब्द अपभ्रष्ट होऊ न देण्याचे काम व्याकरण करते.

निरुक्त - शब्दांची व्युत्पत्ती व अर्थ सांगण्याचे शास्त्र निर्माण झाले, तेच निरुक्त. वेदांतील शब्दांचे व धातूंचे संग्रह म्हणजे 'निघंटू' वा शब्दकोश. वैदिक समानार्थक व अनेकार्थक पदांचा वा धातूंचा जो सर्वप्राचीन उपलब्ध कोश आहे, त्याला निघंटू असे नाव आहे. ह्या कोशावर यास्काने लिहिलेले भाष्यही निरुक्त ह्या नावाने प्रसिद्ध आहे.

छंद : छंद ह्या वेदांगाला 'छंदोविचिती' अशीही संज्ञा आहे. वेदांतील बरेच मंत्र छंदोबद्ध असून छंद हे वेदमंत्रांप्रमाणे वेदमंत्रांनी करावयाच्या यज्ञकर्माशीही निगडित आहेत. बाहमणग्रंथांमध्ये छंदाच्या गूढ व अद्भुत सामर्थ्याची वर्णने येतात. पिंगल यांचा छंदः सूत्र हा ग्रंथ ह्या वेदांगाचा प्रतिनिधी मानला जातो.

ज्योतिष : सत्तावीस नक्षत्रे, चंद्राच्या अवस्था, सूर्याचे संक्रमण, ऋतूंची परिवर्तने ह्या सर्वांचे पद्धतशीर परिगणन यज्ञाच्या निमित्ताने वैदिक ऋषीला काळजीपूर्वक करावे लागे. श्रौत व गृहय कर्मांसाठी लागणारे पंचांग वैदिक काळी अस्तित्वात आले. सत्तावीस नक्षत्रांची आकाशातील मांडणी ही प्रथम वेदकाली वैदिकांनी

शोधली. शुक्लयजुर्वेदात ‘नक्षत्रदर्श’ म्हणजे ज्योतिषी ह्याचा उल्लेख आलेला आहे. वेदांगज्योतिषाचे बरेच ग्रंथ लुप्त झाले असून लगध नामक आचार्यांचा ‘ज्यौतिषम्’ (इ. स. पू. १४००) हा एकच लहानसा निबंध शिल्लक राहिला आहे.

श्रीमद्भगवद्गीतेमध्ये पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार ह्यांना अपरा शक्ति म्हटले आहे.

श्री शंकराचार्य जीं नी प्रश्नोपनिषद् मधे अपरा विद्ये बद्दल भाष्य करताना असे म्हटले आहे की

'अपरा विद्या गोचरं संसारं व्याकृतविषयं साध्य साधन लक्षणं अनित्यम्।'

अपरा विद्या जीवनमरणाच्या चक्रातून मुक्ति देत नाही.

प्रश्न असा आहे की जर वेद आणि वेदांगे अपरा विद्या असतील तर उपनिषद् ह्या शब्दाचा व्यापक अर्थ जो आपण पहिल्या मंत्रामधे वाचला त्याची सांगड कशी घालायची? वेद जरी मुखोद्गत केले आणि ते सहा अंगाद्वारे समजून घेतले तरी उपनिषदात विद्या ग्रहण करण्याच्या पद्धती कठोर आहेत. वेद म्हणजे त्याला जाणणे. आपल्यामध्ये असणाऱ्या परमात्म्याला जाणणे. अक्षर ह्या शब्दाचा येथे हेतूपुरस्सर श्लेष केलेला दिसतो. अक्षर म्हणजे वर्णमाला नव्हे तर परब्रह्माचे ज्ञान करून देणारी विद्या, पराविद्या. सर्व ग्रंथांचे पठण करून झाल्यावर ज्याने कठोर उपासना केली नाही, त्याने काहीच मिळवले नाही. परा विद्या जाणून घेऊन आपल्याला अथर्व व्हायचे आहे.

ऋचो अक्षरे परमे व्योमन्यास्मिन्देवा अधि विश्वे निषेदु:। यस्तं न वेद किमृचा करिष्यति, य इत् तद् विदुस्ते इमे समासते||

श्वेताश्वतरोपनिषद 4/8

(ऋग्वेद 1. 164. 39 अथर्ववेद 9. 15. 18

ज्याने 'त्याला' जाणले नाही त्याला ऋचा वाचून काय उपयोग?

अधि आणि गम् धातू पासून निर्माण झालेला शब्द अधिगम्य म्हणजे प्राप्त होणे आणि त्यागणे सुद्धा.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की (आधीच्या श्लोकाचा संदर्भ घेऊन)

त्यापैकी अपरा विद्या म्हणजे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, तसेच शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि जोतिषशास्त्र. आणि आता परा विद्या म्हणजे जिच्यायोगे अविनाशी तत्व जाणले जाते.

---

**यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णम अचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादम्। नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदद्वयं यद्भूतयोनिं परिपश्यन्ति धीराः ॥1.1.6**

यत् तत् अद्रेश्यम् अग्राह्यम् अगोत्रम् अवर्णम् अचक्षुःश्रोत्रम्। तत् अपाणिपादम् नित्यम् विभुम् सर्वगतम् सुसुक्ष्मम् तत् अव्ययम् यत् धीराः भूतयोनिम् परिपश्यन्ति ॥

यत् जे यद् नपु. प्र. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

अद्रेश्यम् अदृश्य अद्रेश्य नपु. प्र. ए. व.

दृश +क्यप् प्रत्यय

अग्राह्यम् ग्रहण न करता येण्यासारखे अग्राह्य नपु. प्र. ए. व.

ग्रह धातू ग्रहण करणे

अगोत्रम् गोत्र नसलेले अगोत्र नपु. द्वि. ए. व.

अवर्णम् वर्णहीन अवर्णम् पु. द्वि. ए. व.

अचक्षुःश्रोत्रम् डोळे व कान नसलेले

अचक्षु चक्षुस् पु. प्र. ए. व.

श्रोत्रम् श्रोत्र नपु. द्वि. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

अपाणिपादम् हातापाया शिवाय अपाणिपाद नपु. द्वि. ए. व.

नित्यम् नित्य नपु. द्वि. ए. व.

विभुम् विविध रूपे असणारे विभु पु. द्वि. ए. व.

वि+भू धातू होणे

सर्वगतम् सर्वव्यापी सर्वगतं नपु. द्वि. ए. व.

सुसूक्ष्मम् अतीसूक्ष्म सुसूक्ष्म नपु. द्वि. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

अव्ययम् अविनाशी अव्यय नपु. द्वि. ए. व.

यत् जे यद् नपु. प्र. ए. व.

धीराः बुद्धिमान धीर पु. प्र. ब. व.

धी धातू जाणून घेणे हिच वृत्ती असणारे धीर

भूतयोनिम् भूतांचे उगमस्थान भूतयोनिं स्त्री. द्वि. ए. व.

परिपश्यन्ति सर्वत्र पाहतात परि+दृश् धातू ज्ञान होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

परा आणि अपरा विद्या ह्या मधील फरक आपण आधीच्या मंत्रात समजून घेतला. आता ह्या मंत्रात परब्रह्माचे स्वरूप आपण जाणून घेणार आहोत. त्याचे अस्ति आणि नास्ति अशा दोन्ही स्वरूपात वर्णन केले आहे.

येथे वापरलेल्या प्रत्येक विशेषणाचा अर्थ समजून घेणे संयुक्तिक ठरेल. कारण परब्रह्माची फक्त अनुभूतीच शक्य आहे. ज्याची व्याख्या करता येणे केवळ अशक्य, अंगिरा ऋषींनी ते समजावून सांगितले आहे. त्या दृष्टीने खूप महत्त्वाचा मंत्र. कोणत्याही वैज्ञानिक सत्याच्या पलिकडे असलेली ही शक्ती, अदृश्य आहे. फारफारतर हि निर्माण झालेली सृष्टी ही त्या शक्तीचा अविष्कार असे म्हणता येईल. आपले नेत्र हे दृश्य पाहण्याचे साधन, पण परब्रह्म असे पाहता येत नाही म्हणून ते अदृश्य. परब्रह्माचा अंश म्हणजे आपला आत्मा, तो सुद्धा आपल्याला पाहता येत नाही. जे पाहता येत नाही ते ग्रहण सुद्धा करता येत नाही. म्हणजेच ते अग्राह्य असे आहे. गोत्र म्हणजे वंशावळ. बृहद-आरण्यकातील 2.2.4 मंत्रात सप्तर्षींचा उल्लेख केला आहे.

एक कान गौतम तर दुसरा भारद्वाज.  दोन डोळ्यांपैकी एक विश्वामित्र आणि दुसरा जमदग्नि. दोन नासिकांपैकी एक वशिष्ठ आणि दुसरी कश्यप, आणि जीभ अत्रि आहे. ह्या अर्थाने गोत्र म्हणजे इन्द्रिये. गौः गमन म्हणजे पुढे जाणारे. पण परमात्म्याला ना उगम आहे ना अंत आहे म्हणून तो अगोत्रम्.

कोणतेही रंगरूप नसलेला, गुणरहित असा अवर्णम्.

आकार उकार नसलेला असा अर्थातच चक्षु व श्रोत्र यांनी रहित, हस्त व पाद यांनी रहित. त्याच्या अस्तित्वासाठी त्याला कोणत्याही माध्यमाची आवश्यकता नाही पण तो सर्वव्यापी आहे. नित्य, सर्वविध (विभु म्हणजे विविध रूपी, ब्रह्मदेवापासून  सर्व प्राण्यांच्या रूपात सर्वविध असणारा), सर्वव्यापी असल्याने अत्यंत सूक्ष्म असणे साहजिकच आहे. असा हा क्षयरहित, सर्व प्राण्यांच्या उत्पत्तीला कारण आहे. यानंतरचे शेवटचे दोन शब्द सुद्धा महत्त्वाचे. परिपश्यन्ति ह्या क्रियापदाचा अर्थ संपूर्ण तपशीलवार, सर्व अंगानी परीपूर्ण असे अपरोक्ष ज्ञान असणारा विवेकी हे जाणून आहे की हे परब्रह्मच सर्व भूतामात्रांचे उगमस्थान आहे. आणि हीच ती पराविद्या होय.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

जे अदृश्य आहे, अग्राह्य, अगोत्र, अवर्ण आहे, त्याला डोळे कान हात पाय नाहीत, ते शाश्वत आहे, विविधरूपी आहे, सर्वव्यापी आणि सूक्ष्माहून सूक्ष्म असे अविनाशी तत्व संपूर्ण निर्मिती चे उगमस्थान आहे हे विवेकी पुरुष जाणतात.

---

**यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च यथा पृथिव्यामोषधयः संभवन्ति। यथा सतःपुरुषात् केशलोमनि तथाऽक्षरात् सम्भवतः विश्वम्॥1.1.7।।**

यथा ऊर्णनाभिः  सृजते गृह्णते च यथा पृथिवीम् ओषधयः सम्भवन्ति यथा सतः पुरुषात् केशलोमानि तथा इह अक्षरात् विश्वम् सम्भवति ॥

यथा जसे अव्यय

ऊर्णनाभिः कोळी ऊर्णनाभि पु. प्र. ए. व.

सृजते निर्माण करतो सृज् धातू रचना करणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

गृह्णते गिळून टाकतो ग्रह् धातू स्वीकार करणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र.पु. ब. व.

च सुद्धा अव्यय

यथा ज्याप्रमाणे अव्यय

पृथिवीम् पृथ्वीवर पृथिवी स्त्री. द्वि. ए. व.

ओषधयः वनस्पती ओषधि स्त्री. प्र. ब. व.

उष + दाहे घञ्

ओषो धीयतेऽत्र । ओष + धा + कि

धि धातू संचय करणे

सम्भवन्ति निर्माण होतात सम+भू धातू होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

यथा जसे अव्यय

सतः (जिवंत) असणारा सत् पु. पं. ए. व.

सत् अस् धातू शतृ प्रत्यय नपु. प्र. ए. व.

पुरुषात् पुरूषात पुरुष पु. पं. ए. व.

केशलोमनि केस आणि लव केशलोमनि नपु. द्वि. ए व.

तथा त्याप्रमाणे अव्यय

इह येथे अव्यय

अक्षरात् अक्षरतत्वापासून अक्षर नपु. पं. ए. व.

विश्वम् जग विश्व नपु. द्वि. ए. व.

सम्भवति निर्माण होते सम+भू धातू होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आता ह्या मंत्रात परब्रह्मापासून ह्या विश्वाची निर्मिती झाली हे सांगण्यासाठी तीन उदाहरणे दिली आहेत. ह्यामागे काय हेतू असावा बरे? तीन वेगवेगळे मुद्दे स्पष्ट करून सांगायचे आहेत का? हे समजून घेण्यासाठी तीनही उदाहरणांचा बारकाईने अभ्यास करायला हवा.

पहिले उदाहरण दिले आहे कोळयाच्या जाळ्याचे. श्रीदत्तात्रेयांनी २४ गुरूंपासून जे ज्ञान घेतले त्यापैकी एक गुरू कोळी, हा आपल्याच नाभीतील ग्रंथीतून सूत्र निर्माण करून त्याचे जाळे बनवितो. ह्यामधे त्याची चिकाटी आणि कलात्मकता दिसून येते. आपले सावज पकडून झाले कि ते जाळे स्वत:मध्ये सामावून घेतो. ह्यातून एक स्पष्ट झाले की हे जग परमेश्वराचाच अंश आहे. आधीच्या मंत्रातील अगोत्र हा गुण येथे लक्षात येतो. यातून दुसरा असाही अर्थ निघू शकतो की परमेश्वर स्वतः च्या उपजीविकेसाठी हे जग निर्माण करतो. पण तसा अर्थ निघू नये म्हणून दुसरे उदाहरण दिले असावे.

पृथ्वीच्या पोटातून निरनिराळ्या वनस्पती निर्माण होतात. वनस्पतीशास्त्राच्या संशोधनाने झाडांची निरनिराळ्या प्रकारची उपयुक्तता आहे. वातावरणाचा समतोल, पर्जन्य, मातीचे आरोग्य, पाण्याचे शुद्धिकरण आणि पुनरूत्पादन. मात्र वनस्पतिंची उत्पत्ती व पोषण करण्यात पृथ्वीचा स्वतःचा असा काहीच हेतू नसतो. आधीच्या मंत्रात सांगितल्याप्रमाणे पृथ्वीला डोळे, कान, हातपाय नसतात पण निरनिराळ्या आकाराची रंगांची आणि गुणधर्माची पानेफुले पृथ्वी निर्माण करते.

तिसरे उदाहरण जिवंत व्यक्तीच्या डोक्यावरील केस आणि शरीरावरील लव याचे दिले आहे जे चैतन्याची साक्ष देते . शरीरावरील लव हे सूक्ष्मतत्वांचे प्रतिक मानले तर अमर्याद, सर्वव्यापी अशा परब्रह्माने असे मर्यादित माणसाचे शरीर निर्माण केले आहे.

थोडक्यात परमतत्त्वाने केलेली ह्या जगताची निर्मिती अतिशय विनासायास, अहेतुक, अकारण अशी आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ज्याप्रमाणे कोळी स्वतःच आपले जाळे विणतो आणि गिळंकृत करतो, ज्याप्रमाणे निरनिराळ्या वनस्पती पृथ्वी मधून उद्भवतात. जसे जिवंत माणसाच्या डोक्यावर केस आणि शरीरावर लव उगवते त्याचप्रमाणे अक्षरतत्वापासून विश्वाची उत्पत्ती होते.

---

**तपसा चीयते ब्रह्म ततोऽन्नमभिजायते। अन्नात् प्राणो मनः सत्यं लोकः कर्मसु चामृतम् ॥1.1.8।।**

तपसा चीयते ब्रह्म ततोऽन्नमभिजायते |

अन्नात् प्राणो मनः सत्यं लोकाः कर्मसु चामृतम् ||

तपसा तपाने तपस् नपु. तृ ए. व.

चीयते विकसित होते चि धातू एकत्र करणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

ततः त्यापासून (तत्+तः तासिल प्रत्यय पर्यायी पंचमी )

अन्नम् अन्न नपु. द्वि . ए. व.

अभिजायते उत्पन्न होते अभि+जी धातू नष्ट होणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

अन्नात अन्नापासून अन्न नपु. पं. ए. व.

प्राणः प्राण पु. प्र. ए. व.

मनः मनस् नपु. प्र. ए. व.

सत्यम् महाभूते सत्य नपु. द्वि. ए. व.

लोकाः जग लोक पु. प्र. ब. व.

कर्मसु कर्मांमधे कर्मन् नपु. स. ब. व.

च सुद्धा अव्यय

अमृतम् कर्म फळे अमृत नपु. द्वि. ए. व.

ह्या मंत्रातील पहिला शब्द तपस् ज्यामुळे आपल्याला तप, तपश्चर्या ह्याची आठवण होते. तप म्हणजे उग्रता असे आपल्याला वाटते. मात्र ब्रम्ह पुराणातील मंत्रानुसार ‘मनस च इन्द्रियाणां च एकाग्र्यं परमं तपः’ - तपस्या म्हणजे मन आणि इन्द्रियांचे  एकीकरण. एखादे लक्ष्य पूर्ण करण्यासाठी एकवटलेली शक्ती. अष्टांग योगातील नियमातील 3 रा नियम म्हणजे तप. तीन प्रकारचे तप मानसिक, वाचिक आणि शारीरिक हे श्रीमद्भगवद्गीतेत सांगितले आहेत. भगवान विष्णूंना सुतपा

म्हणजे महा तपस्वी म्हटले आहे. परमेश्वरांचे ही सृष्टी निर्माण करणे हे लक्ष्य, त्यासाठी त्यांनी तप केले. सृष्टि निर्माण करून त्याच्या भरणपोषणाची आणि वृद्धि होण्याची जबाबदारी पण परमेश्वराचीच. अतिशय आदर्श असा प्रकल्प त्यांच्या तपस्येतून निर्माण झाला. अतिशय क्रमवार, टप्प्याटप्प्याने विकसित झालेली ही सृष्टी आधी ब्रह्मदेवाची निर्मिती करून , त्यापासून अन्नाची निर्मिती झाली. अन्न ह्या शब्दाचा व्यापक अर्थ येथे घेता येईल, जसे जीवशास्त्रीय सत्यानुसार आधी जलसृष्टी निर्माण झाली, टप्प्याटप्प्याने निरनिराळे जीव निर्माण होण्यासाठी आवश्यक असे वातावरण निर्माण झाले. त्यानंतर मन आणि बुद्धि असणारा मनुष्यप्राणी निर्माण झाला. प्राण आणि मन यांच्या निकटच्या संबंधाला मान्यता आहे. श्वासाची गती मनातील भावभावनांप्रमाणे बदलते.

पंचमहाभूतांना उपनिषदात सत्य असे म्हटले आहे. कारण ती तुलनेने शाश्वत असतात. मनावर राज्य करणाऱ्या माया शक्ती मुळे स्वार्थी अहंकार युक्त कर्मे केली जातात. ह्या क्रियांच्या प्रतिक्रिया म्हणजेच कर्मफळे. म्हणून ती शाश्वत, नाश न होणारी, म्हणून 'अमृतम्'.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ब्रह्मदेव तपाने विकसित पावतात. त्यांच्या पासून अन्नाची निर्मिती होते. अन्नापासून प्राण, (प्राणापासून) मन, (मनापासून) पंचमहाभूते आणि (पंचमहाभूतांपासून) हे लोक, (लोकांपासून) कर्मे आणि कर्मांपासून कर्मफळे.

---

**यः सर्वज्ञः सर्वविद् यस्य ज्ञानमयं तपः। तस्मादेतद् ब्रह्म नाम रूपमन्नं च जायते ॥1.1.9।।**

यः सर्वज्ञः सर्वविद् यस्य ज्ञानमयं तपः तस्मात् एतत् ब्रह्म नाम रूपम् अन्नं च जायते ॥

यः जो यद् पु. प्र. ए. व.

सर्वज्ञः सर्वज्ञ पु. प्र. ए. व.

सर्वविद् सर्वविद् नपु. प्र. ए. व.

सर्व+विद् धातू जाणणे +क्विप् प्रत्यय

यस्य ज्याचे यद् पु. ष. ए. व.

ज्ञानमयम् ज्ञानमय नपु. प्र. ए. व.

तपः पु. प्र. ए. व.

तस्मात् त्यापासून तद् पु. पं. ए. व.

एतत् हे एतद् नपु. प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

नाम नामन् नपु. प्र. ए. व.

रूपम् रूप नपु. प्र. ए. व.

अन्नं अन्न नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

जायते जन् धातू उत्पन्न होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आता पुन्हा 3 र्या मंत्रात शौनक ऋषींनी अंगिरसांना विचारलेल्या प्रश्नाकडे वळायला हवे. त्यांनी विचारले होते, अशी कोणती विद्या आहे जी जाणून घेतल्याने सर्व काही ज्ञात होते? त्याचे उत्तर आता ह्या मंत्रात गोषवारा करून सांगितले आहे. तपस्येने ब्रह्मदेव विकसित होतात हे आपण आधीच्या मंत्रात वाचले आहेच. ह्या मंत्रात नाम आणि रूप म्हणजेच व्यक्तीमत्व उत्पन्न होते असे म्हटले आहे. ब्रह्म हे सूक्ष्मात सूक्ष्म आहे असे आधी म्हटले आहे.

सर्वज्ञ (सर्व काही जाणणारा) आणि सर्वविद् (ज्ञानमय तपस्या) ह्या दोन्ही शब्दांचे अर्थ इतक्या सहजतेने समजणे कठीण आहे. ब्रह्म समजून घेणे म्हणजे व्यक्तीमत्व समजून घेणे.

ह्या मंत्रात असा विचार प्रकट केला आहे की

सर्वविद् आणि सर्वज्ञ असलेल्या प्रखर तपस्येने ज्ञानस्वरूप ब्रह्मापासून नामरूपे आणि अन्न ह्या सर्वांची निर्मिती झाली आहे.

---

## मुण्डकोपनिषद् प्रथम मुण्डक द्वितीय खण्ड

**तदेतत् सत्यं मन्त्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यंस्तानि त्रेतायां बहुधा संततानि। तन्यचरथ नियतं सत्यकामा एष वः पन्थाः सुकृतस्य लोके ॥ मुण्डकोपनिषद् 1.2.1।।**

कवयः मन्त्रेषु  कर्माणि यानि अपश्यन् तत् एतत् सत्यम्। त्रेतायम् तानि बहुधा सन्ततानि। सत्यकामाः नियतम् तानि आचारथ। सुकृतस्य लोके वः एषः पन्थाः ॥

कवयः द्रष्टे कवि पु. प्र. ब. व.

मन्त्रेषु मन्त्रांमधे मन्त्र पु. स. ब. व.

कर्माणि कर्मे कर्मन् नपु. द्वि. ब. व.

यानि जी यद् नपु. द्वि. ब. व.

अपश्यन् पाहिली दृश् धातू कर्तरि लङः लकार प्र. पु. ब. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

एतत् हे एतद् नपु. प्र. ए. व.

सत्यम् सत्य नपु. द्वि. ए. व.

त्रेतायाम् त्रेतायुगात त्रेता स्त्री. स. ए. व.

तानि ती तद् नपु. द्वि. ब. व.

बहुधा विविध प्रकारे अव्यय

सन्ततानि सतत सन्तत नपु. द्वि. ब. व.

सत्यकामाः सत्याची इच्छा करणारे सत्यकाम पु. प्र. ब. व.

नियतम् नेहमी नियत पु. द्वि. ए. व.

तानि ती तद् नपु. द्वि. ब. व.

आचरथ आचरण करावे आङः +चर् धातू कर्तरि लट लकार म. पु. ब. व.

सुकृतस्य शुभ कर्माचे सुकृत पु. ष. ए. व.

लोके जगात लोक नपु. स. ए. व.

वः तुमचा युष्मद् ष. ब. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

पन्थाः पन्थ पु. प्र. ब. व.

मुण्डकोपनिषदाच्या प्रथम मुण्डकातील प्रथम खण्डात आपण परा आणि अपरा विद्या यामधील फरक जाणून घेतला. आता प्रथम मुण्डकातील द्वितीय खण्डात ऋग्वेदातील मंत्र आणि त्या अनुषंगाने केली जाणारी कर्मे ह्यांचे विवेचन वाचायला मिळणार आहे. पुस्तक लिहिताना आपण जसे सुरवातीला विषयाची तोंड ओळख करून देतो आणि त्यानंतर एक एक मुद्द्यावर चर्चा करतो तशीच साधारण रचना येथे दिसून येत आहे. ह्या खण्डात विविध कर्मकांडांवर चर्चा केली आहे. ते वाचून मनात संभ्रम निर्माण होतो की ह्या उपनिषदात कर्मकांडांवर इतका भर कशासाठी दिला आहे? अर्थात त्याचे उत्तर दुसऱ्या मुण्डकात आपोआपच मिळते.

त्रेतायां ह्या शब्दाचा अर्थ नेमका कसा घ्यावा, केवळ त्रेता युगाचा उल्लेख महर्षींना करावयाचा आहे का ते तपासून पहावे लागेल. कारण त्रेता म्हणजे तीन गोष्टींचा संग्रह. म्हणजे येथे तीनही वेदांचा उल्लेख केला आहे का?

सुभाषितानुसार

त्रेतायां मंत्र-श्क्तिश्च, ज्ञानशक्तिः कृते-युगे द्वापरे युद्ध-शक्तिश्च, संघशक्ति कलौ युगे।।

सत्ययुगात ज्ञान शक्ति, त्रेता युगात मन्त्र शक्ति तर द्वापर युगात युद्ध शक्ति चे प्रस्थ होते मात्र कलियुगात संघटनात्मक शक्ति हीच प्रधान आहे.

मंत्र म्हणजे उपदेश. त्यानंतर सन्तत आणि नियत असे दोन शब्द वापरले आहेत. म्हणजेच जे उपदेश दिले आहेत, त्या प्रमाणे ते नेहमी आणि नियमपूर्वक पाळायचे आहेत.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

मंत्रामधे जी विविध प्रकारची कर्मे महर्षींना आढळली, जी त्रेतायुगात आचरली जात होती. सत्य जाणून घेऊ इच्छिणाऱ्यांनी ती नियमित आणि नियमपूर्वक आचरणात आणावी. या जगात चांगल्या कर्मांची फळे प्राप्त करण्याचा हाच योग्य मार्ग आहे.

---

**यदा लेलायते ह्यर्चिः समिद्धे हव्यवाहने।**

**तदज्यभागवंतरेणाहुतीः प्रतिपदायेत्॥ 1.2.2।।**

यदा समिद्धे हव्यवाहने हि अर्चिः लेलायते तदा अज्यभागौ अंतरेण आहुतीः प्रतिपादयेत् ॥

यदा जेव्हा अव्यय

समिद्धे प्रज्वलित झालेल्या समिद्धः पु. स. ए. व. सम्+इन्ध् धातू प्रज्वलित होणे क्तः प्रत्यय

हव्यवाहने यज्ञाग्निमधे हवि+वाहन नपु. द्वि. द्वि. व.

हविस् हु धातू यत् प्रत्यय हव्य, हव्यस्य वाहनं हव्यवाहनम्

हि अर्चिः ज्वाळा अर्चिस् नपु. द्वि. ए. व.

लेलायते पुन्हा पुन्हा उसळणाऱ्या लेलीय प्र. ए. व.

लल् धातू लट् लकार प्र. पु. ए. व.

किंवा ली (श्लेषणे) +यङः प्रत्यय =लेलीय

तदा तेव्हा अव्यय

अज्यभागौ तूप सोडण्याची जागा

आ-अञ्ज्-क्यप् प्रत्यय तूप

भागौ भाग पु. प्र. द्वि. व.

अंतरेण दोन भागांत अंतर नपु. तृ. ए. व.

आहुतीः आहुति स्त्री. प्र. ब. व.

आङ् + हु धातू + क्तिन् प्रत्यय

प्रतिपादयेत् अर्पण करावे प्रति+पद् धातू मिळणे + णिच् दिवादिः कर्तरि विधिलिङ् लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या मंत्रात सांगितल्याप्रमाणे निरनिराळ्या कर्मकांडासंबंधि आपण आता वाचणार आहोत. कर्मकांडामधे सर्वात महत्त्वाचा तो यज्ञ.

यज्' या धातूपासून निर्माण झालेला हा शब्द. याचा अर्थ 'देवादिकांचा आदर , संगतीकरण, आणि दान' असा होतो. आपणापेक्षा जे श्रेष्ठ आहेत, त्यांची पूजा करणे म्हणजे यज्ञ. आपल्या मनात मैत्रीची भावना ठेवून सर्वांशी एका विचाराने जगताना प्रगती करण्याची कला म्हणजे संगतीकरण. आपल्यापेक्षा कनिष्ठ व्यक्तींना ज्ञान, बल आणि धन ह्या स्वरुपात मार्गदर्शन करणे म्हणजे दान होय. या संपूर्ण क्रियेला यज्ञ अस म्हणतात.

अग्नीचे आपल्या आयुष्यातील महत्त्व वेगळे सांगायला नको. मात्र ह्या अग्नीचे आणि यज्ञीय अग्नीचे पावित्र्य वेगळे असावे असे मत स्वातंत्र्यवीर वि.दा. सावरकर यांनी नोंदविले आहे. ( भारतीय संस्कृती कोश, खंड सातवा, पृष्ठ क्र. 600)

यज्ञ हा शब्द ऋग्वेदात अनेकदा वाचायला मिळतो, त्याचा अर्थ बहुतेक वेळा श्रेष्ठ कर्म असाच घेतला गेला आहे. संहितांचे जे ब्राह्मण्य ग्रंथ आहेत त्यामध्ये आयुष्यातील छोट्या-मोठ्या प्रसंगांसाठी यज्ञ करण्यास सांगितले आहेत. ब्राह्मण्य ग्रंथांचा समावेश श्रुतींमध्ये होतो म्हणून ब्राह्मण्य ग्रंथात सांगितलेल्या यज्ञाला 'श्रौतयज्ञ' असे म्हणले जाते.

गृहस्थाने पाच यज्ञ करावेत असे म्हटले आहे.

देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ, ब्रह्मयज्ञ.

ह्या यज्ञांमुळे देव, पिता, पशू, मनुष्य, समाज व गुरू या पाचही ऋणातून मुक्त होता येते असे म्हणतात. यज्ञ प्रक्रियेत समिधांची आहुती देण्याची पद्धत आहे. त्याच बरोबर 'इदम् न मम् ' असे म्हणण्याची पद्धत आहे. प्रथम मुण्डकातील प्रथम खण्डातील 7 व्या मंत्रात ब्रह्मदेवाने पृथ्वीमधून ओषधि वनस्पती निर्माण केल्या असे वाचले होते. त्याच वनस्पतींपैकी काही समिधा म्हणून आहुती द्यायच्या आणि हे सर्व माझे नाही असे म्हणायचे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

अग्नी प्रज्वलित केल्यानंतर जेव्हा ज्वाला भडकल्यानंतर जेथे तूप सोडले जाते त्याठिकाणी आहुतींना अर्पण करावे.

---

**यस्याग्निहोत्रमदर्शमपौर्णमासं अचातुर्मास्यमनाग्रयणमतिथिवर्जितं च। अहुतमवैश्वदेवमविधिना हुतं आसप्तमांस्तस्य लोकान् हिनस्ति ॥ 1.2.3।।**

यस्य अग्निहोत्रम् अदर्शम् अपौर्णमासम् अचातुर्मास्यम् अनाग्रयणम् अतिथिवर्जितम् अहुतम् अवैश्वदेवम् अविधिना हुतम् च तस्य आसप्तमान् लोकान् हिनस्ति ॥

यस्य ज्याचे यद् पु. ष. ए. व.

अग्निहोत्रम् अग्निहोत्र नपु. द्वि. ए. व.

अदर्शम्  दर्श अमावस्या यज्ञ कर्म शिवाय

अ +दर्शम् दर्श नपु. द्वि. ए. व.

अपौर्णमासम् पौर्णिमा यज्ञ कर्म शिवाय अ+पौर्णमास नपु. द्वि. ए. व.

अचातुर्मास्यम् चातुर्मास यज्ञ कर्म शिवाय

अ+चातुर्मास्य

नपु. द्वि. ए. व.

अनाग्रयणम् नव धान्य यज्ञकर्म शिवाय अन्+आग्रयणम्

नपु. द्वि. ए. व.

अग्रे अयनं

अतिथिवर्जितम् अतिथि शिवाय

अतिथिवर्जित नपु. द्वि. ए. व.    व्रज् धातू सोडणे

अहुतम् अयोग्य आहुती अ+हुत नपु. द्वि. ए. व.

हु धातू भक्षण करणे

अवैश्वदेवम् विश्वदेव कर्म रहित

अ+वैश्वदेव नपु. द्वि. ए. व.

अविधिना नियमबाह्य अ+विधि पु. तृ. ए. व.

हुतम् हवन हुत नपु. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

तस्य त्याचे तद् पु. ष. ए. व.

आसप्तमान् सातपर्यंत आ+सप्तम पु. द्वि. ब. व.

लोकान् पिढ्या लोक पु. द्वि. ब. व.

हिनस्ति नष्ट होतात हिंस् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

प्रथम मुण्डकातील द्वितीय खण्डातील पहिल्या मंत्रात नियमित आणि नियमपूर्वक कर्मकांडे करण्यास सांगितले होते. तसे न केल्यास त्याचे परिणाम काय होतील त्याचे वर्णन ह्या मंत्रात केले आहे. ते वाचण्याआधी एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी. जसे न्यायसंस्था आणि निरनिराळे कायदे ही ब्रिटिशांनी आपल्याला दिलेली देणगी. त्यापूर्वी धर्म म्हणजे आपली कर्तव्ये होती. आपण आपली कर्तव्ये नीट पार पाडावी त्यासाठी धार्मिक गोष्टींचा वापर लोकांवर वचक ठेवण्यासाठी करत असावे. जेव्हा परा आणि अपरा विद्यांचा स्पष्ट उल्लेख केला जातो तेव्हा अपरा विद्या म्हणजेच कनिष्ठ विद्या ह्या सामान्य माणसांसाठी असाव्यात असे मनात ठेवून हे मंत्र वाचले तर ते फारसे वावगे वाटत नाहीत.

ह्या मंत्रात अग्निहोत्र असा उल्लेख आहे. अग्निहोत्र आणि यज्ञ ह्यात नेमका फरक काय? तर काहीच नाही. सूर्योदय आणि सूर्यास्ताच्या वेळी दैनंदिन केला जाणारा यज्ञ म्हणजे अग्निहोत्र. आयुर्वेदात ह्याचे फायदे सांगितले आहेत.

दर्श अमावस्या हि पितृपक्षातील पितरांप्रती समर्पित आहे.

पौर्णिमा आणि चातुर्मास ह्या बद्दल आपण जाणतोच. बहुत करून पवित्र लोकांच्या जयंती पौर्णिमेला असतात. आणि चातुर्मासातील दिवस आपण पवित्र मानतो.

आपल्याकडे नवीन धान्य तयार झाले की त्याप्रती कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आग्रयण यज्ञ करण्याची पद्धत आहे.

अत् धातू फिरत राहणे+ इथिन्=अतिथि

अ+तिथि,ह्यामधील तिथि हा शब्द आपल्याला माहीत आहे. तिथिशिवाय म्हणजे अचानक येणारा तो अतिथि.

विश्वदेव म्हणजे देवांचा एक समूह. धर्मदेवांनी दक्षाच्या 10 मुलींशी विवाह केले त्यापैकी एकीचे नाव विश्वा, तिच्या पुत्राचे नाव विश्वदेव. ऋग्वेदात विश्वदेवांचा उल्लेख सापडतो.

भविष्य पुराणात दहा विश्वेदेवांचे उल्लेख आहेत.

कृततुर्दक्षो वसुः सत्यः कालकामो धृतिः कुरुः। शङ्कुमात्रो वामनश्च विश्वेदेवा दश स्मृतः। ।। भविष्य पुराण. 1.125.12

क्रतु, दक्ष, वसु, सत्य, काला, काम, धृति, कुरु, शंकुमात्रा, वामन हे दहा विश्वेदेव आहेत.

सर्वात पहिल्या मंत्राप्रमाणे (1.1.1)विश्वकर्ता हा ब्रह्मदेव आहे.

ह्या मंत्रातील आ+सप्तम ह्याचा अर्थ समजून घ्यायला हवा.

'आ'उपसर्गाचा अर्थ पर्यंत असा होतो.

त्यापुढे लोकान् हा शब्द वापरला आहे.

आपल्या धार्मिक समजूत प्रमाणे सात लोक आहेत. भूलोक (पृथ्वी और आकाश), भुवर्लोक , स्वर्गलोक , महर्लोक , जनार्लोक , तपलोक आणि सत्यलोक.

आधी चर्चा केल्यानुसार जर कोणी नियमबाह्य (अविधि) वागत असेल (ह्या मंत्रात नियमबाह्य यज्ञ करत असेल) तर हे सात लोक त्याला प्राप्त होणार नाहीत.

आसप्तम ह्याचा दुसरा अर्थ आधीच्या सात पिढ्या असाही काही ठिकाणी लिहिला आहे.

ह्या मंत्राचा सारासार विचार करता गुरू आपल्या शिष्याना काय सांगू इच्छितात. तर अंगी शिस्त बाळगून, नियमबाह्य कामे टाळून दानधर्म आणि दयावृत्ती असू द्यावी. ह्या सर्वाद्वारे आत्म उन्नती साधावी.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ज्याचे अग्निहोत्र दर्शकर्मविरहीत आहे तसेच पौर्णिमा व चातुर्मास यज्ञ विरहित आहे. (ज्याचे अग्निहोत्र) कापणीला आलेल्या नवीन धान्य अर्पण करण्याचा यज्ञ, अतिथिपूजनवर्जित, योग्य प्रकारे आहुती न दिलेले, वैश्वदेव पूजन वर्जित किंवा नियमबाह्य यज्ञ असे असेल तर त्याचे सात पिढ्यातील लोक नष्ट होतात.

---

**काली काली कराली च मनोजवा च सुलोहिता या च सुधूम्रवर्णा।**

**स्फुलिङ्गिनी विश्वरुची च देवी लेलायमाना इति सप्त जिह्वाः ॥1.2.4।।**

काली कराली मनोजवा सुलोहिता सुधूम्रवर्णा स्फुलिङ्गिनी विश्वरुची देवी च इति लेलायमानाः सप्त जिह्वाः ॥

काली काळी काली स्त्री. प्र. ए. व.

कराली अती उग्र कराली स्त्री. प्र. ए. व.

कराल + ङीष् प्रत्यय

मनोजवा मनासारखे जोरात धावणे, चंचल मनोजवा स्त्री. प्र. ए. व.

जु सौत्रो धातू धावणे

+ अच् टाप्

मन इव जवो यस्याः

सुलोहिता लाल रंगाची सुलोहिता स्त्री. प्र. ए. व.

लोहित + स्त्रियां टाप्

लोहित=रुह + इतन् प्रत्यय

सुधूम्रवर्णा धूरकट सुधूम्रवर्णा

स्त्री. प्र. ए. व.

सु+धूम्र + टाप् प्रत्यय

स्फुलिङ्गिनी ठिणगी स्फुलिङ्गिनी स्त्री. प्र. ए. व.

स्फुल + इङ्गच् प्रत्यय

विश्वरूची बहुरंगी विश्वरूची स्त्री. प्र. ए. व.

देवी देवी स्त्री. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

इति अव्यय

लेलायमानाः फडफडणाऱ्या लेलायमाना स्त्री. प्र. ब. व.

सप्त सात सप्तन् त्रिणी लिंगानि द्वि . ब. व.

जिह्वाः जिभा जिह्वा स्त्री. द्वि . ब. व.

आपल्याला अग्नी कोणकोणत्या रूपात दिसतो त्याचे वर्णन ह्या मंत्रात केले आहे. शास्त्रीय दृष्ट्या निळ्या रंगाची ज्योत सर्वात चांगली मानली जाते. पिवळ्या रंगाच्या ज्योतीमुळे भांड्यांवर काजळी चढते. मिणमिणती ज्योत आपल्याला माहीत आहे. धुमसत्या अग्नीचा फक्त धूर दिसून येतो. ह्या मंत्रात अग्नीच्या 7 जीभा आहेत असे म्हटले आहे. बायबल मध्ये तर जीभेलाच अग्नी म्हटले आहे (जेम्स 3.5.6)

अग्नीतत्व हा वेगळाच समजून घेण्याचा विषय आहे.

आपल्या पचनशक्तीला जठराग्नी म्हणतात.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ज्वालांच्या सात फडफडणाऱ्या जीभा, काळी, अक्राळविक्राळ, मनासारखी चंचल, लाल रंगाची, धूरकट वर्णाची, ठिणगीस्वरूपात आणि बहुरंगी देवी आहेत.

---

**एतेषु यश्चरते भ्राजमानेषु यथाकालं चाहुतयो ह्याददायन्। तं नयन्त्येताः सूर्यस्य रश्मयो यत्र देवानां पतिरेकोऽधिवासः ॥ 1.2.5।।**

यः भ्राजमानेषु एतेषु यथाकालम् आहुतयः आददायन् चरते तम् एताः सूर्यस्य रश्मयः यत्र एकः देवानाम् पतिः अधिवासः नयन्ति हि ।।

यः जो यद् पु. प्र. ए. व.

भ्राजमानेषु प्रदीप्त ज्वाळांमधे

भ्राज् धातू चमकणे शानच् प्रत्यय पु. स. ब. व.

एतेषु यामध्ये एतद् पु. स. ब. व.

यथाकालम् योग्य वेळी यथाकाल पु. द्वि. ए. व.

आहुतयः आहुति स्त्री. प्र. ब. व.

आददायन् देतो

चरते आचरतो चर् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

तम् त्याला तद् पु. द्वि. ए. व.

एताः या एतद् स्त्री. द्वि. ब. व.

सूर्यस्य सूर्याची सूर्य पु. ष. ए. व.

रश्मयः किरणे रश्मि स्त्री. प्र. ब. व.

यत्र जेथे अव्यय

एकः एक पु. प्र. ए. व.

देवानाम् देवांचा देव पु. ष. ब. व.

पतिः अधिपती पति पु. प्र. ए. व.

अधिवासः निवास अधिवास पु. प्र. ए. व.

नयन्ति घेऊन जातात नी धातू प्राप्त होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

3र्या मंत्रात नियमपूर्वक यज्ञ न केल्याचे दुष्परिणाम सांगितले होते आता ह्या मंत्रात विधिवत यज्ञ केला असता त्यापुढे काय घडते ते सांगितले आहे.

दिव् धातूपासून तयार झालेला शब्द देव म्हणजे प्रकाश देणारा, मार्ग दाखवणारा. देवांचा अधिपति म्हणजे इन्द्रदेवाचा येथे उल्लेख केला आहे. पर्जन्यदेवता असणाऱ्या इन्द्रदेव ही पोषण देवता आहे. 'उदरभरण नोहे  जाणिजे यज्ञ कर्म.'याची सुरुवात पर्जन्यदेवतेपासूनच होते.

ह्या मंत्रात असे म्हटले आहे की

जो योग्य वेळी प्रदीप्त अशा ज्वाळांमधे अग्निहोत्र करून आहुती देतो त्याला त्या ज्वाळा, सूर्य किरणांप्रमाणे जेथे देवांच्या स्वामी च्या एक निवास स्थल (आहे तेथे) पोहोचवतात.

---

**एह्येहिति तमहुतयः सुवर्चसः सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहन्ति। प्रियं वाचमभिवदन्त्योऽर्चयन्त्य एष वः पुण्यः सुक्रोतो ब्रह्मलोकः ॥ 1.2.6 ॥**

सुवर्चसः आहुतयः एहि एहि एषः वः सुकृतः पुण्यः ब्रह्मलोकः इति प्रियाम् वाचम् अभिवदन्त्यः अर्च्ययन्त्यः च तं यजमानं सूर्यस्य रश्मिभिः वहन्ति ॥

सुवर्चसः दैदीप्यमान सुवर्चस् पु. ष. ए. व.

आहुतयः आहुत्या आहुति स्त्री. प्र. ब. व.

एहि एहि इकडे या आङ् + इ धातू जाणे कर्तरि लोट् लकार परस्मैपद म. पु. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

वः तुमच्या युष्मद् ष. ब. व.

सुकृतः सत्कर्माने सुकृत पु. प्र. ए. व.

पुण्यः पुण्य पु. प्र. ए. व.

ब्रह्मलोकः ब्रह्मलोक पु. प्र. ए. व.

इति अव्यय

प्रियाम् मधूर प्रिया स्त्री. द्वि. ए. व.

वाचम् वाणी वाच् स्त्री. द्वि. ए. व.

अभिवदन्त्यः उच्चारणाऱ्या अभि + वद् + शतॄँ  प्रत्यय स्त्री. प्र. ब. व.

अर्च्ययन्त्यः स्तुती करणाऱ्या अ+चर् धातू शतृ प्रत्यय स्त्री. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

तम् त्याला तद् पु. द्वि. ए. व.

यजमानम् यजमान पु. द्वि. ए. व.

सूर्यस्य सूर्याच्या सूर्य पु. ष. ए. व.

रश्मिभिः किरणांद्वारे रश्मि स्त्री. तृ. ब. व.

वहन्ति नेतात वह् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

आधीच्या मंत्रात आपण योग्य पद्धतीने यज्ञ केल्यास आपल्या आहुती यजमानास इन्द्रदेवापर्यंत पोहोचवतात असे वाचले. पण हे कसे घडते त्याचे वर्णन ह्या श्लोकात काव्यात्मक रूपात केले आहे. जो मनापासून, चांगल्या भावनेने काम करतो त्याला सर्वांचेच सहकार्य मिळते. ह्या मंत्रात असे म्हटले आहे की

प्रकाशमान अशा आहुती  'इकडे या '  'इकडे या ' असा सुमधुर वाणीने स्तुती करून ब्रह्मलोकः म्हणजे तुमच्या सत्कर्माचे फळ आहे आणि त्याकडे जाण्याचा हा सुनियोजित मार्ग आहे असे सांगून यजमानांना सूर्याच्या किरणांद्वारे तिकडे घेऊन जातात.

---

**प्लवा ह्येते अदृधा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म। एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापि यान्ति ॥ 1.2.7 ॥**

एते हि अष्टादश यज्ञरूपाः प्लवाः अदृढाः येषु अवरम् कर्म उक्तम्। ये मूढ़ाः एतत् श्रेयः इति अभिनन्दन्ति ते पुनः अपि जरामृत्युं यान्ति एव ॥

एते या एतद् पु. प्र. ब. व.

हि खरोखर अव्यय

अष्टादश अठरा

यज्ञरूपाः यज्ञरूपी यज्ञरूप पु. प्र. ब. व.

प्लवाः नौका प्लव पु. प्र. ब. व.

प्लु धातू जाणे

अदृढाः बेभरवशाच्या अदृढ पु. प्र. ब. व.

येषु ज्यांच्या मध्ये यद् पु. स. ब. व.

अवरम् निकृष्ट अवर पु. द्वि. ए. व.

वृ धातू पसंत करणे

कर्म कर्मन् नपु प्र. ए. व.

उक्तम् सांगितले आहे उक्त नपु. प्र. ए. व.

ये जे मूर्ख यद् पु. प्र. ब. व.

मूढ़ाः मूढ पु. प्र. ब. व.

एतत् हे एतद् नपु. प्र. ए. व.

श्रेयः श्रेयस्कर श्रेय पु. प्र. ए. व.

इति असे अव्यय

अभिनन्दन्ति प्रशंसा करतात अभि+नन्द् धातू वृद्धि होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

पुनः पुन्हा अव्यय

अपि सुद्धा अव्यय

जरामृत्युं वृद्धत्व आणि मृत्यू

यान्ति प्राप्त होतात

एव पुन्हा अव्यय

आता हळूहळू उपनिषदातील मुख्य गाभा म्हणजे परा विद्येची ओळख करून देण्याची सुरुवात ह्या मंत्रापासून होते आहे असे वाटते.

यज्ञकर्म करण्यासाठी 16 ऋत्विज् आणि यजमान व त्यांच्या पत्नी अशा 18 जणांची उपस्थिती अपेक्षित असते. 16 ऋत्विज् पैकी 4 जण प्रमुख

होतृ, अध्वर्यु,उद्भाता आणि ब्रह्मा. ह्यांना जोड देणारे 12 जण पुढीलप्रमाणे मैत्रावरुण, प्रतिप्रस्थाता, ब्राह्मणच्छंसी, प्रस्तोता, अच्छावाक्, नेष्टा, आग्नीध्र, प्रतिहर्त्ता, ग्रवस्तुत्, उन्नेता, पोता और सुब्रह्मण्य.

ऋग्वेदात ऋत्विजांसंबंधी मंत्र सापडतो.

तवग्ने होत्रं तव पोत्रमृत्वियं तव नेष्ट्रं त्वमग्निदृतायतः। तव प्रशास्त्रं त्वमध्वरीयसि ब्रह्मा चासि गृहपतिश्च नो दमे ॥ऋग्वेद 2.1.2॥

मनुस्मृति 2.143 मध्ये ऋत्विज् संबंधी श्लोक दिसून येतो.

अग्निधेयं पकायज्ञनाग्निष्टोमादिकं माखन | यः करोति वृतो यस्य स तस्यर्त्विगिहोच्यते ||मनुस्मृति।। 2. 143 ||

यज्ञकर्म ह्या शब्दाचा विस्तृत अर्थ आपण श्रीमद्भगवद्गीता वाचताना समजून घेतला आहे तसेच कर्मयोग सुद्धा समजून घेतला आहे. आपल्या आयुष्याचा हेतू आपल्याला उमगायला हवा. यज्ञ म्हणजे विशिष्ट हेतूने केलेला प्रकल्प. आपल्या स्वार्थासाठी केलेला यज्ञ निकृष्ट आणि त्याची कर्मफळे सुद्धा. कर्मयोगी आपल्या कर्माकडे परमेश्वराचे कर्म असे मानतो आणि निष्काम भावाने कर्म करतो. आपला समाजात कर्मकांडांना अवास्तव महत्त्व दिले गेले आहे. ह्या श्रुतीच्या निमित्ताने आपल्या विचारांना चालना मिळत आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ज्यामध्ये निकृष्ट कर्म सांगितले आहे, जे अठरा जणांच्या सहभागाने केले जाते असे यज्ञ म्हणजे अस्थिर नौका आहेत. पण हेच यज्ञ श्रेयस्कर अशी भलावण जे मूर्ख करतात ते पुन्हा पुन्हा वृद्धत्व आणि आणि मृत्यू ला सामोरे जातात.

**अविद्ययामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पण्डितं मन्यमानाः।जङ्घन्यमानाः परियन्ति मूढ़ा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥1.2.8।।**

अविद्ययाम् अंतरे वर्तमानाः स्वयं धीराः पंडितं मन्यमानाः जङ्ःघन्यमानाः मूढ़ाः अंधेन एव नीयमानाः अंधाः यथा परियन्ति ॥

अविद्ययाम् अंतरे वर्तमानाः कायम अविज्ञेत राहणारे

अविद्ययाम्  अविद्या स्त्री. स. ए. व.

अंतरे  अव्यय (अन्तर+इ धातू जाणे, अंतर ठेवून असणे +विच् प्रत्यय कृदन्त नपु.स. ए. व.)

वर्तमानाः वर्तमान पु. प्र. ब. व.

स्वयं स्वतः सु+अय नपु. प्र. ए. व.

धीराः बुद्धिमान धीर पु. प्र. ब. व.

पंडितम् पंडित पु. द्वि. ए. व.

मन्यमानाः मानणारे मन्यमान पु. प्र. ब. व.

मान् धातू ज्ञान प्राप्तीची इच्छा करणे

जङ्घन्यमानाः पीडित होत राहतात

जङ्घन्यमान पु. प्र. ब. व.

हन् धातू मारणे यङन्त प्रत्यय जङ्घन्यते शानच् रूप

मूढाः मूर्ख मूढ पु. प्र. ब. व.

अंधेन अंधांकडून अंध पु. तृ. ए. व.

एव सुद्धा अव्यय

नीयमानाः नेल्या जाणाऱ्या नीयमान नी धातू नेणे  कर्मणि शानच्

अंधाः अंधांसारखे अंध पु. प्र. ब. व.

यथा जसे अव्यय

परियन्ति भ्रमण करतात परि+इ धातू जाणे कर्तरि लट् लकार प्र. पु. ब. व.

आधीच्या मंत्रात पुनः म्हणजे वारंवार असा शब्द वापरला होता आता ह्या श्लोकात धातू ची यङन्त रूपे वापरली आहेत.

श्रुती मधील एकेक मंत्र आपल्याला जीवनकोशल्ये शिकवतात. ज्ञान मिळवणे महत्त्वाचे आहेच पण ते सतत मिळवत राहिले पाहिजे. आपल्याला पूर्ण ज्ञान प्राप्त झाले आहे असे ठामपणे म्हणता येत नाही कारण सतत निरनिराळे पैलू आपल्यासमोर उलगडत राहतात. फक्त ते समजून घेण्याची आपली तयारी हवी त्यासाठी आपली दृष्टी चौफेर असावी हे समजावून सांगताना अंध व्यक्तीचे उदाहरण दिले आहे. जी व्यक्ती अंध आहे ती दुसऱ्यांना मार्ग दाखवू शकत नाही. आधीच्या मंत्राचा संदर्भ घेऊन ला मंत्र वाचला तर मोक्ष मिळवण्याचा मार्ग ज्ञानप्राप्ती आहे असे लक्षात येते. त्याही पुढे जाऊन निरर्थक कर्मकांडे करण्यात वेळ न घालवता परा विद्या प्राप्त करण्यासाठी प्रयास करायला हवे. आणखी पुढे जाऊन विचार केला तर माणसाने आपली कुवत ओळखून दुसऱ्याला उपदेश द्यायला हवा असे सुद्धा येथे म्हटले आहे. ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

---

जे लोक अज्ञानी असून स्वतःला बुद्धिमान पंडित समजतात ते खरे तर मूर्ख असतात आणि अंध व्यक्तीप्रमाणे चाचपडत जाणाऱ्या व्यक्तीसारखे मार्गक्रमण करतात.

**अविद्यायां बहुधा वर्तमान वयं कृतार्था इत्यभिमन्यन्ति बालाः। यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात् तेनातुराः क्षीणलोकश्च्यवन्ते ॥1.2.9।।**

अविद्यायाम् बहुधा वर्तमानाः बालाः वयम् कृतार्थाः इति अभिमन्यन्ति। यत् कर्मिणः रागात् न प्रवेदयन्ति तेन क्षीणलोकाः आतुराः च्यवन्ते॥

अविद्यायाम् अविद्येत अविद्या स्त्री. स. ए. व.

बहुधा बहुतांश अव्यय बहु+धा

वर्तमानाः असणारे वर्तमान पु. प्र. ब. व.

बालाः बालबुद्धिचे बाल पु. प्र. ब. व.

वयम् आम्ही अस्मद् प्र. ब. व.

कृतार्थाः धन्य कृतार्थ पु. प्र. ब. व.

इति असे अव्यय

अभिमन्यन्ति विचार करतात अभि+मन् धातू अवबोधणे

यत् जे यद् नपु प्र. ए. व.

कर्मिणः कर्माचे अनुयायी कर्मिन् पु. प्र. ब. व.

रागात् आसक्तीने राग पु. पं. ए. व.

रञ्ज् धातू रंगणे घञ् प्रत्यय

न अव्यय

प्रवेदयन्ति जाणत नाहीत प्र+वेद् धातू णिच् कर्तरि लट् लकार प्र. पु. ब. व.

तेन त्यांच्या कडून तद् पु. तृ. ए. व.

क्षीणलोकाः (कर्म फले) क्षीण झाल्यावर

क्षीणलोक पु. प्र. ब. व.

क्षि धातू + क्तः प्रत्यय

आतुराः (दुःखाने) आतुर आतुर पु. प्र. ब. व.

आङ् + तुर धातू  शीघ्रता करणे+ क प्रत्यय

च्यवन्ते च्युत होतात च्यु धातु जाणे कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

हा मंत्र वाचला की त्या काळातील विशेषणे वापरण्याची पद्धत आणि आताची पद्धत फारशी वेगळी नसावी असे वाटते. जसे ह्या मंत्रात बाल हा शब्द बालबुद्धी म्हणजे अज्ञानी असा वापरला आहे. येथे वयाचा संबंध नाही. ज्ञानेश्वरांनी तर 15 व्या वर्षीच आत्मानुभव लिहिला. रञ्ज् धातू पासून तयार झालेला शब्द राग म्हणजे आसक्ती दर्शवतो. म्हणजे आधीच बालबुद्धी आणि त्याबरोबर विषयआसक्ती सुद्धा. आधीच्या मंत्रांचा अर्थ लक्षात ठेवून ह्या मंत्राचा अर्थ लावायला हवा. कारण आधीच्या मंत्रात अपरा विद्या चा अर्थ सांगून कर्मकांडांवर टीका केली आहे. तसेच कर्मकांडांवर सीमित राहून पुढील प्रगतीचा मार्ग बंद केल्यास दुःखदायक परीणाम होतील असे ह्या मंत्रात स्पष्ट म्हटले आहे. 7व्या मंत्रात असे म्हटले होते की कर्मकांडाची भलावण करणारे पुन्हा पुन्हा जीवनमरणाच्या फेऱ्यात अडकतात. ह्या मंत्रात असे लोक पदच्युत होतात असे म्हटले आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

नाना प्रकारांच्या अविद्येत तच रममाण असलेले बालबुद्धीचे लोक त्यातच धन्यता मानतात. पण आसक्ती युक्त कर्मी हे समजू शकत नाहीत की त्यांच्या पुण्यकर्मांची फळे क्षीण झाली की त्यांचे अधःपतन होते.

**इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढ़ाः नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वा लोकं हीनतरं वा विशन्ति ॥ 1.2.10 ॥**

इष्टापूर्तं वरिष्ठं मन्यमानाः प्रमूढाः अन्यत् श्रेयः  न वेदयन्ते ते सुकृते नाकस्य पृष्ठे अनुभूत्वा इमं लोकं हीनतरं वा विशन्ति ॥

इष्टापूर्तं  श्रौतकर्म आणि स्मार्त कर्म

इष्टापूर्त नपु. प्र. ए. व.

यज् धातू + क्त प्रत्यय

केटी प्रत्यय (इष्ट)

पृ धातू पालन करणे + भावे क्तः प्रत्यय

वरिष्ठं सर्वोत्तम वरिष्ठ नपु. प्र. ए. व. वर धातू +इष्ठन्

मन्यमानाः मानणारे मन्यमान पु. प्र. ब. व.

प्रमूढाः अज्ञ माणसे प्र+मूढ पु. प्र. ब. व.

अन्यत् दुसरे सर्वनाम अन्+यत्

श्रेयः श्रेयस्कर श्रेय पु. प्र. ए. व.

न अव्यय

वेदयन्ते जाणत नाहीत प्र+वेद धातू जाणणे णिच् कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

सुकृते सत्कर्माचे फळ सुकृत पु. स. ए. व.

नाकस्य पृष्ठे स्वर्गाची पाठ

नाक पु. ष. ए. व.

कं - सुख

अकं-दुःख

न+अकं=नाकं (जेथे दुःख नाही असा, स्वर्ग)

पृष्ठ पु. स. ए. व.

अनुभूत्वा अनुभवून अनु+भू धातू असणे +क्त्वा प्रत्यय

इमं या इदम् पु. द्वि. ए. व.

लोकं लोकात लोक पु. द्वि. ए. व.

हीनतरं निम्न हीनतर नपु. प्र. ए. व.

हीन+तरप् प्रत्यय

हा धातू त्यागणे +क्तः प्रत्यय

वा किंवा अव्यय

विशन्ति प्रवेश करतात विश् धातू प्रवेश करणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

ध्यानयोगाचा अभ्यास केला असता परमेश्वराला जोडून घेता येते. कोणतेही कर्मकांड केल्याशिवाय हे शक्य आहे. हे आपण पतंजली योगसूत्राद्वारे जाणतो.

अन्न वस्त्र निवारा ह्या प्राथमिक गरजांपैकी शेती करणे, घरे बांधणे हे आपापले करता येते. मात्र पाण्याची सोय सार्वजनिकरीत्या करावी लागते. म्हणूनच तलाव आणि विहीर खोदणे अशा कर्मांना पूर्त कर्म असे म्हणतात तर यज्ञयाग प्रकारच्या कर्मांना इष्ट कर्म असे म्हणतात. अशी कर्मे केली असता स्वर्गप्राप्ती होते पण ती तात्पुरत्या स्वरूपात. मोक्षप्राप्ती हवी असेल तर त्यासंबंधीचे ज्ञान प्राप्त करणे आवश्यक आहे. उपनिषदांतील हे मन्तव्य अतिशय महत्त्वाचे. ह्या मध्ये एक महत्वाचा मुद्दा सांगितला आहे की सर्व साधारण जो आपला समज असतो की एकदा मानवी जन्म मिळाला की इतर योनी मध्ये पुनर्जन्म होत नाही, हा समज खोटा ठरविला आहे. दुष्कर्म केल्यास पशूयोनीत पुनर्जन्म होऊ शकतो.

ह्या मंत्रात असे म्हटले आहे की

यज्ञ, दान इत्यादी कर्मे सर्वोत्तम मानणारे लोक अज्ञानी असतात. त्यांना आणखी कल्याणकारी मार्ग माहीत नसतात. त्यांच्या सत्कर्मांच्या फळांचे स्वर्गलोकात उपभोग घेतल्यावर ते पुन्हा ह्या लोकांत (मानवी देहात) किंवा आणखी निम्न स्तरांत प्रवेश करतात.

---

**तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्यां चरन्तः। सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ॥1.2.11 ॥**

ये हि शान्ताः विद्वांसः भैक्षचर्यां चरन्तः अरण्ये तपःश्रद्धे उपवसन्ति ते विरजाः सूर्यद्वारेण यत्र सः अमृतः अव्ययात्मा पुरुषः प्रयान्ति ॥

ये जे यद् पु. प्र. ब. व.

हि खरोखर अव्यय

शान्ताः संयमाने शान्त पु.. ब. व.

विद्वांसः विद्वान विद्वस् पु. प्र. ब. व.

भैक्षचर्यां भिक्षा वृत्ती भैक्षचर्या स्त्री. द्वि. ए. व.

भैक्ष भिक्षाणां समूह

चरन्तः राहतात चरत् पु. प्र. ब. व.

अरण्ये वनात अरण्य नपु. स. ए. व.

तपःश्रद्धे तप आणि श्रद्धा तपःश्रद्धा स्त्री. प्र. द्वि. व.

उपवसन्ति राहतात उप+वस् धातू कर्तरि लट् लकार प्र. पु. ब. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

विरजाः पवित्र विरजा स्त्री. प्र. ब. व.

वि+रञ्ज् धातू +णिच्+अच् प्रत्यय

सूर्यद्वारेण सूर्य मार्गाने सूर्यद्वार नपु. तृ. ए. व.

यत्र जेथे अव्यय

सः तो तद् पु. प्र. ए. व.

अमृतः अ+मृत् अमृत पु. प्र. ए. व.

अव्ययात्मा अविनाशी अव्ययात्मन् पु. प्र. ए. व.

वि+इ धातू जाणे

पुरुषः पुरूष पु. प्र. ए. व.

प्रयान्ति जातात प्र+या जाणे धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

आकाश आणि पृथ्वीला रोज जोडणारा दुवा म्हणजे सूर्यकिरणे जी रोज दृश्य स्वरूपात आपल्याला दिसून येतात. तसा पाऊस काही काळापुरताच असतो. स्वर्ग हा आकाशाच्या दिशेला ही आपली ठाम समजूत आहे. तर स्वर्ग प्राप्ती कोणाला होते ते सांगणारा हा मंत्र. येथे भैक्षचर्या म्हणजे भिक्षा मागून जीवन जगण्याचा उल्लेख केला आहे. तसेच अरण्यात तप करण्याचा उल्लेख आहे. थोडक्यात मिताहारी, तप करण्यासाठी एकांतात राहणारा. अरण्यात कोणत्याही सुखसुविधांशिवाय भिक्षा मागून शरीराला कष्ट देऊन तप करण्यात जीवन व्यतीत करता करता मानसिक आणि शारीरिक शुद्धी (आसक्तीविरहीत) झाली की आपोआपच मोक्ष मिळण्याचा मार्ग मोकळा होतो.

ह्या मंत्रात असे म्हटले आहे की

परन्तु जे विद्वान अरण्यात भिक्षाचर्य अनुसरून तप करून शुद्धी प्राप्त करतात ते सूर्य किरणांच्या मार्गाने मृत्यूरहीत आणि अविनाशी पुरुषांच्या स्थानी पोहोचतात.

**परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन। तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥1.2.12।।**

कर्मचितान् लोकान् परीक्ष्य ब्राह्मणः निर्वेदम् आयात्। कृतेन अकृतः न अस्ति तत् - विज्ञानार्थं सः समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं गुरुम् एव अभिगच्छेत् ॥

कर्मचितान् कर्म संचित कर्मन् +चि धातू गोळा करणे क्त प्रत्यय पु द्वि. ब. व.

लोकान् लोकांचे लोक पु. द्वि. ब. व.

परीक्ष्य परीक्षण करून परी+ईक्ष् धातू निरीक्षण करणे ल्यप प्रत्यय

ब्राह्मणः ब्राह्मण पु. प्र. ए. व.

निर्वेदम् नास्तिक, वैराग्य निर्वेद पु. द्वि. ए. व.

निर+विद् धातू जाणणे

आयात् प्राप्त करून आङ् + या धातू जाणे + क्तः कर्तरि लङ्ः लकार प्र. पु. ए. व.

कृतेन कर्माने कृत नपु. तृ. ए. व.

अकृतः शाश्वत अकृतः अकृत पु. प्र. ए. व.

न अव्यय

अस्ति आहे अस् धातू असणे अदादि गण कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

विज्ञानार्थं ज्ञान मिळवण्यासाठी विज्ञान+अर्थ नपु. द्वि. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

समित्पाणिः हातात समिधा घेऊन

समित्पाणि पु. प्र. ए. व.

समित् +पाणि

समिध् पु/स्त्री. प्रथमा ए.व.

समिधः पाण्योः यस्य सःसमित्पाणि।

श्रोत्रियं शास्त्र पारंगत श्रोत्रिय पु. द्वि. ए. व.

श्रु धातू ऐकणे तृच्छ् प्रत्यय

ब्रह्मनिष्ठं ब्रह्मनिष्ठ पु. द्वि. ए. व.

गुरुम् गुरु पु. द्वि. ए. व.

एव सुद्धा अव्यय

---

अभिगच्छेत् जावे अभि+गम् धातू जाणे कर्तरि विधीलिङः लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या मंत्रात मोक्ष प्राप्तीचा मार्ग सांगितला. अरण्यात जाऊन आसक्ती विरहित होऊन तप करायचे आहे. मोक्ष मिळण्याची प्रक्रिया ही साधीसुधी नव्हे. त्यासाठी अपरा विद्येच्या पलिकडे जाऊन ज्ञान मिळवायचे आहे. जे अपरा विद्येचे ज्ञात आहेत त्यांचा तपशीलवार अभ्यास करायचा आहे. त्यांच्या कडून केली गेलेली यज्ञकर्मे कामना आणि वासना अशा दोषयुक्त व्यक्तींनी केली होती की ते दोषमुक्त होते? हे सर्व जाणून घेऊन आपला पुढचा मार्ग ठरवायचा आहे. ह्या सर्व प्रक्रियांना परीक्ष्य असे म्हटले आहे. परीक्षा करण्यासाठी अनुभव, अनुमान, उपमा आणि आगम हे निकष लावायचे असा शंकरभाष्यामधे उल्लेख आहे. 10 व्या मंत्रात लोक स्वर्गात आपली कर्मफळे भोगून, इहलोकात परत येतात असे म्हटले आहे. आपल्याला अढळपद मिळवायचे आहे. ब्राह्मण ह्या शब्दाचा व्यापक अर्थ समजून घेणे खूप आवश्यक आहे. त्यासाठी विज्ञानार्थ ह्या शब्दाचा आधार घेता येईल. ब्राह्मण म्हणजे ज्ञान प्राप्ती मुळे प्रगल्भता आणि उन्नत असा व्यक्ती . कर्मकांडे करणारा नव्हे. तो श्रोत्रिय म्हणजे सर्व शास्त्रांत पारंगत आहे. आणि तो आपल्या ज्ञानाचा सर्वार्थाने उन्नतीसाठी वापर करत आहे. तो ब्रह्मनिष्ठ आहे म्हणजे त्याला परमतत्त्वाची स्वानुभूती प्राप्त झाली आहे. म्हणजे फक्त कर्मयोगावर विसावून चालणार नाही त्याबरोबर ज्ञानयोग सुद्धा हवा. त्याचबरोबर कठोर तपश्चर्या सुद्धा करायची आहे. असा मनाचा दृढ निश्चय झाला की हातात समिधा घेऊन गुरुकडे जायचे आहे. समिधा हे गुरूसमोर संपूर्णपणे शरणागती पत्करण्याचे प्रतिक आहे. समिधा म्हणजे निरनिराळ्या वनस्पतींच्या काटक्या ज्या ज्वलनशील आहेत, म्हणजे सर्व नकारात्मक गोष्टीं जळून गेल्या आहेत. अशी अंतर्बाह्य पवित्रता अकृत म्हणजे शाश्वत अशा परमतत्त्वाची अनुभूती घेण्यास सिद्ध होत आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

कर्म संचिताचे प्राप्त झालेले फळ हे शाश्वत नाही हे समजून घेऊन ब्राह्मणाने (साधकाने) वैराग्ययुक्त होऊन, ज्ञान प्राप्ती साठी श्रुतिसंपन्न, ब्रह्मनिष्ठ अशा गुरूकडे हातात समिधा घेऊन जावे.

**तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक् प्रशान्तचित्ताय शमान्विताय। येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम् ॥1.2.13।।**

सः विद्वान् प्रशान्तचित्ताय शमान्विताय सम्यक् उपसन्नाय तस्मै येन सत्यम् अक्षरम् पुरुषं वेद तां ब्रह्मविद्यां तत्वतः प्रोवाच ॥

सः तो तद् पु. प्र. ए. व.

विद्वान् विद्वस् पु. प्र. ए. व.

प्रशान्तचित्ताय चित्त शांत झालेल्या

प्रशान्तचित्त पु. च. ए. व.

शमान्विताय मन ताब्यात असलेला असा

शम+अन्वित पु. च. ए. व.

अनु+इण् धातू जाणे क्त प्रत्यय

सम्यक् उचित सम्यक् पु. प्र. ए. व. सं+अञ्च धातू पूजा करणे  क्विन् प्रत्यय

उपसन्नाय समीप आलेल्या उपसन्न उप+सद् धातू क्त प्रत्यय पु. च. ए. व.

तस्मै त्याला तद् पु. च. ए. व.

येन ज्यायोगे यद् पु. तृ. ए. व.

सत्यम् सत्य नपु. द्वि. ए. व.

अक्षरम् अविनाशी अक्षर नपु. द्वि. ए. व.

पुरुषम् पुरूष पु. द्वि. ए. व.

वेद जाणतो विद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

ताम् ती तद् स्त्री. द्वि. ए. व.

ब्रह्मविद्याम् ब्रह्मविद्या स्त्री. द्वि. ए. व.

तत्वतः खरोखर अव्यय

प्रोवाच सांगावी प्र+ब्रू धातू बोलणे कर्तरि लिट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

---

आधीच्या मंत्रात परब्रह्माच्या शोधात असलेल्या शिष्याने गुरूकडे समिधा घेऊन जावे हे सांगताना शिष्याची पात्रता काय असावी ते सांगितले होते. साधक स्थिर बुद्धीचा, मन अतिशय निश्चल असून त्याने मनावर पूर्ण ताबा मिळवला आहे. शम म्हणजे आसक्तीविरहीत. शिष्याची ब्रह्मविद्या संपादन करण्याची एवढी तयारी झाली असेल तर गुरु कल्पनातीत ज्ञानी असणारच. ब्रह्मविद्या शिकवणारा गुरू हा साक्षात तेजच. आता ह्या मंत्रात गुरूजनांनी शिष्यांशी कसे वागावे ह्या संबंधी सूचना दिल्या आहेत.

गुकारस्त्वन्धकारस्तु रुकार स्तेज उच्यते l अन्धकार निरोधत्वात् गुरुरित्यभिधीयते ॥

'गु'कार म्हणजे अंधकार, 'रु'कार म्हणजे प्रकाश जो अंधकार संपवतो (ज्ञान प्रकाश देऊन ) त्याला गुरु असे म्हणतात.

गुरौ न प्राप्यते यत्तन्नान्यत्रापि हि लभ्यते। गुरुप्रसादात सर्वं तु प्राप्नोत्येव न संशयः।।

गुरु कडून जे ज्ञान प्राप्त होत नाही, ते इतरही कुठेच मिळत नाही. गुरु ची कृपाच निःसंशय (माणसाला ) वरदान असते.

उपनिषद् ह्या शब्दाचा अर्थच गुरूच्या जवळ जाऊन बसणे.

ब्रह्मविद्या म्हणजे काय ते संक्षिप्तपणे आपण सर्वात पहिल्या (1.1.1)मंत्रात वाचले.

आपल्या आयुष्यातील अंधकार नष्ट करणारी ती ब्रह्मविद्या. हि विद्या सत्य, अक्षर अशा पुरुषाला जाणून घेतल्याने प्राप्त होणार आहे.

अक्षर ह्या शब्दाचा अर्थ विस्ताराने सांगण्यासाठी शंकरभाष्यामधे तीन शब्द वापरले आहेत.

क्षर धातूपासून तयार झालेला शब्द क्षरण म्हणजे धूप होणे

क्षण् धातू +क्त प्रत्यय पासून झालेला शब्द म्हणजे क्षत आघात होणे (गुणवत्ता कमी होणे)

क्षि धातू म्हणजे ऱ्हास होणे पासून क्षय

थोडक्यात जे अक्षर आहे त्याचा ऱ्हास होत नाही, त्याच्या गुणवत्तेत फरक पडत नाही किंवा त्याची धूप होत नाही.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

चित्त शांत असलेल्या, मनावर ताबा मिळवलेल्या  शिष्याला जो ज्ञानी गुरुंच्या जवळ आला आहे, त्याला ज्यायोगे सत्य अक्षर पुरूषाचे ज्ञान होते अशी ब्रह्मविद्या, तत्वतः उचित प्रकारे शिकवावी.

**|| इति मुण्डकोपनिषदि प्रथममुण्डके द्वितीयः खण्डः ||**

मुण्डकोपनिषद् मधील प्रथम मुण्डकातील दूसरा भाग  येथे संपन्न झाला.

---

**मुण्डकोपनिषद् 2.1.1-10**

**तदेतत् सत्यं यथा सुदीप्तात् पावकाद् विस्फुलिङ्गाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः। तथाक्षराद् विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते तत्र चैवापि यन्ति ॥2.1.1||**

तत् एतत् सत्यं यथा सुदीप्तात् पावकाद् सरूपाः विस्फुलिङ्गाः सहस्रशः प्रभवन्ते तथा सोम्य विविधाः भावाः अक्षरात् प्रजायन्ते तत्र एव अपि यन्ति च ॥

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

एतत् हे एतद् नपु. प्र. ए. व.

सत्यम् सत्य नपु. प्र. ए. व.

यथा ज्याप्रमाणे अव्यय

सुदीप्तात् प्रज्वलित सुदिप्त पु. पं. ए. व. सु+दीप् धातू प्रकाशित होणे क्त प्रत्यय

पावकाद् अग्नी पासून पावक पु. पं. ए. व.

पावक (शुद्ध करणारा) अग्नी

सरूपाः त्या स्वरूपाच्या स+रूपा स्त्री. प्र. ब. व.

रूपेण सह सरूपाः

विस्फुलिङ्गाः अग्नीकण वि+स्फुलिङ्ग पु. प्र. ब. व.

स्फुल धातू लवलवणे इङ्गच् प्रत्यय

सहस्रशः हजारों सहस्त्र +शस् प्रत्यय

प्रभवन्ते उत्पन्न होतात प्र+भू धातु चुरादिः गण कर्तरि प्रयोग लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

तथा अव्यय याप्रमाणे

हे सोम्य संबोधन

विविधाः निरनिराळे विविध पु. प्र. ब. व.

भावाः जीव भाव पु. प्र. ब. व.

भू भावयति होणे

अक्षरात् अक्षर ब्रह्मापासून अक्षर पु. पं. ए. व.

प्रजायन्ते जन्माला येतात

प्र जायन्ते जै धातु भ्वादिः भावकर्मणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

तत्र तेथे अव्यय

एव सुद्धा अव्यय

अपि येथे अपि हा उपसर्ग म्हणून वापरला आहे जो धातू पासून वेगळा लिहीला जातो. आवरण ह्या अर्थी त्याचा वापर होतो.

अपि यन्ति पुन्हा जातात

यन्ति इ धातू जाणे कर्तरि लट्लकारः  प्र. पु. ब. व.

च सुद्धा अव्यय

अंगिरा ऋषी, शौनक ऋषींना उपदेश देत असताना त्यांना हे सोम्य! असे संबोधले आहे. त्या मागची त्यांची भूमिका काय असावी ते शोधायला हवे. सोम म्हणजे चंद्र. चंद्रासारखी शीतलता असणारे शौनक ऋषी असा अर्थ अपेक्षित आहे का? सोमपान करणारा तो सोम्य असाही उल्लेख सापडतो आहे.

सर्व सजीवांचा कार्य काल लक्षात घेता, जर ब्रह्मदेवाला अग्नी ची उपमा दिली असेल तर ब्रह्मापासून उत्पन्न होणाऱ्या जीवांना ठिणगी ची उपमा अगदी सार्थ आहे. कारण ब्रह्मदेवाचा एक दिवस एक हजार चतुर्युगांचा असून रात्रही एक हजार चतुर्युगांची असते.।। श्रीमद्भगवद्गीता। 8.17।। असे म्हटले आहे. ठिणगी अग्नी पासून निर्माण होते, थोडावेळ हवेत तरंगते, फार लांब जाऊ शकत नाही आणि पुन्हा अग्नीतच विलीन होते. येथे दोन्ही क्रियांचा उल्लेख केला आहे सृजनता आणि विलीनीकरण. हे वाचल्यावर 'आकाशापरिच्छिन्नत्व न्याय' ह्या लौकिक न्यायाची आठवण होते. एखाद्या घटात जे वातावरण असते तेच घट फुटल्यावर कायम राहते, बाहेरच्या वातावरणाशी एकरूप होऊन जाते. ह्या

अद्वैत तत्वज्ञानाची अनुभूती ह्या श्लोकात होते.

मंत्राची सुरवात 'तत् एतत् सत्यं' म्हणजे हेच ते सत्य अशी केली आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

हे सोम्य! हेच सत्य आहे, ज्या प्रमाणे प्रज्वलित अग्नी पासून त्याच्या सारख्या हजारो ठिणग्या निर्माण होतात, त्याचप्रमाणे ब्रह्म अक्षरापासून निरनिराळे सजीव निर्माण होतात आणि तेथेच विलीन होतात.

**दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः स बाह्याभ्यन्तरो ह्यजः।**

**अप्राणो ह्यमनाः शुभ्रो ह्यक्षरात् परतः परः ॥2.1.2।।**

दिव्यः अमूर्तः अजः शुभ्रः पुरुषः सबाह्याभ्यन्तरः हि हि अप्राणः अमनाः अक्षरात् परतः हि ॥

दिव्यः दिव्य पु. प्र. ए. व.

दिव धातु प्रकाशणे यत् प्रत्यय

अमूर्तः अ+मूर्छ् धातु क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

अजः अज पु. प्र. ए. व.

न जायते जन धातु उत्पन्न होणे

शुभ्रः शुभ् धातु  रक् प्रत्यय पु. प्र. ए. व.

पुरुषः पुरुष पु. प्र. ए. व.

सबाह्याभ्यन्तरः सह बाह्य अभ्यन्तरः अभि+अन्तर पु. प्र. ए. व.

हि हि खरोखर अव्यय

अप्राणः अ+प्राण पु. प्र. ए. व.

अमनाः अ+मन् धातु घः प्रत्यय पु. प्र. ब. व.

अक्षरात् अक्षर नपु. पं. ए. व.

परतः अव्यय

पर+तसिल प्रत्यय

पर=पृ धातु पालन करणे+अच् प्रत्यय

हि खरोखर अव्यय

अक्षर ब्रह्मापासून निरनिराळे जीव उत्पन्न होतात असे आपण आधीच्या मंत्रात वाचले. त्या सर्वांना ठिणगी ची उपमा दिली होती. मुण्डकोपनिषदातील 1.1.8 ह्या मंत्रात ब्रह्माच्या तपश्चर्येने ही जीवसृष्टी निर्माण झाली असे वाचले होते. आता ह्या मंत्रात त्या अक्षरब्रह्म चे वर्णन केले आहे. बऱ्याच उपनिषदात ब्रह्माचे वर्णन केले आहे. तसा मुण्डकोपनिषदातील 1.1.6 ह्या मंत्रात सुद्धा परब्रह्माचे स्वरूप स्पष्ट केले आहे. बृह् धातु म्हणजे वाढणे ह्यापासून निर्माण झालेला शब्द ब्रह्म. त्याच्या तपश्चर्येचे फळ म्हणजे ह्या सृष्टीची निर्मिती आणि येथे राहणारे असंख्य जीव. शंकराचार्यांनी परिवृढ असा शब्दप्रयोग केला आहे. अग्नीला तसा आकार काही नसतो. मात्र तो प्रकाशमान आहे. अक्षरब्रह्म ला दिव्य असे म्हटले आहे. तो स्वयंप्रकाशित आहे. प्रकाश म्हणजे उजेड आणि साहित्यात त्याचा अर्थ ज्ञान सुद्धा.

ब्रह्माला अमूर्त म्हणजे आकार उकार नसलेला निराकार असे सुद्धा म्हटले आहे. देवांच्या मूर्तींची कल्पना अगदीच मानवनिर्मित. अजः म्हणजे अनादी. तो फक्त आहे. तो कशापासूनही निर्माण झालेला नाही. तो म्हणजे केवळ पवित्रता. असे हे चैतन्यरूपी आत्मतत्त्व आत आणि बाहेर सारखेच आहे. तो फक्त पुरुष आहे त्यामुळे प्रकृती चे कोणतेही गुण त्याच्या कडे नाही. म्हणून तो प्राण आणि मन रहीत असा आहे.

महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः । कठोपनिषद् 1.3.11 मध्ये ब्रह्माचा असा उल्लेख आहे. महान आत्म्याहून श्रेष्ठ अव्यक्त आहे आणि अव्यक्त हून श्रेष्ठ पुरुष आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

स्वयंप्रकाशी, निराकार, अनादी, आंतरबाह्य व्यापलेला पवित्र असा प्राण रहीत आणि मन रहीत, अव्यक्तापेक्षा श्रेष्ठ पुरूष आहे.

**एतस्माज्जयते प्राणो मनः सर्वेन्द्रियाणि च।खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥2.1.3।।**

एतस्मात् प्राणः मनः सर्वेन्द्रियाणि खं वायुः ज्योतिः आपः विश्वस्य धारिणी च जायते ॥

एतस्मात् यापासून एतद् पु. पं. ए. व.

प्राणः प्राण पु. प्र. ए. व.

मनः मन पु. प्र. ए. व.

सर्वेन्द्रियाणि सर्व इन्द्रिये

सर्व इन्द्रिय नपु. प्र. ब. व.

खं आकाश ख नपु. प्र. ए. व.

वायुः वायु पु. प्र. ए. व.

ज्योतिः अग्नी ज्योतिस् नपु. प्र. ए. व.

आपः जल आप पु. प्र. ए. व.

विश्वस्य विश्वाला विश्व नपु. ष. ए. व.

धारिणी (विश्वाला)धारण करणारी धारिणी स्त्री. प्र. ए. व.

धारिन् धात्री इन् प्रत्यय  स्त्री. प्र. ए. व.

धात्री धातृ स्त्री. प्र. ए. व. धातृ धा धातु तृच् प्रत्यय

च सुद्धा अव्यय

जायते उत्पन्न होते जन् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

आधीच्या मंत्रात आपण (पुरुष) संबंधी वर्णन वाचले. त्याआधीच्या मंत्रात ब्रह्म अक्षरापासून सर्व सजीव निर्माण होतात आणि तेथेच विलीन होतात हेच सत्य आहे असे वाचले होते. त्याच उत्पत्ती चे आता विस्ताराने वर्णन केले आहे.

हिंदू धर्मातील तत्त्वज्ञानावर प्राचीन सांख्यदर्शन या शास्त्राचा मोठाच प्रभाव आहे.

पंचमहाभूते कशी निर्माण झाली याची चर्चा न्याय, वैशेषिक, वेदान्त इ. दर्शनांनी केली आहे. ही तत्त्वे आत्म्यापासून निर्माण झाली, असे उपनिषदांनी म्हटले आहे.

तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः। आकाशाद्वायुःवायोरग्निः। अग्नेरपः। अदभ्यः पृथिवीः।। तैत्तिरीयोपनिषद् 2.1।। तैत्तिरीय उपनिषदात  आकाश, वायू, अग्नी, आप व पृथ्वी अशी पाच तत्त्वे उत्पन्न झाली, असे म्हटले आहे.

आधीच्या मंत्रात अक्षरब्रह्म, प्राण रहीत आणि मन रहीत आहे असे म्हटले आहे. मात्र तेच प्राण आणि मन ह्यांच्या उत्पत्ती चे कारण आहे. म्हणूनच 1.1.6 ह्या मंत्रात सांगितल्याप्रमाणे अक्षरब्रह्म हे अगोत्र, अवर्ण आणि इन्द्रिये नसलेले असे आहे. आधीच्या मंत्राप्रमाणे त्याचे दिव्य शक्ती हे विशेषण अगदी समर्पक आहे.

‘एकोऽहं बहु स्याम्’ जेव्हा परमात्म्याला आपली उत्क्रांती व्हावी असे वाटते तेव्हा प्राणाची निर्मिती होते.

'शरीरसंयुक्तं ज्ञानं करणमतींद्रियम्।' असे इन्द्रियांचे वर्णन केले आहे.

शरीराची चेतना म्हणजे ‘प्राण’. शरीरातील प्राण त्याचे वय ठरवते म्हणून प्राणाला ‘सर्वायुष्’ असे म्हटले आहे. मनाला 'अंतरिंद्रिय' असे म्हटले जाते.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

याच्यापासून (अक्षरब्रह्म पासून) प्राण, मन, सर्व इंद्रिये, आकाश, वायु, तेज, उदक आणि विश्वाला धारण करणारी पृथ्वी ही उत्पन्न होतात.

**अग्नीर्मूर्धा चक्षुषी चन्द्रसूर्यौ दिशः श्रोत्रे वाग् विवृताश्च वेदाः। वायुः प्राणो हृदयं विश्वमस्य पद्भ्यां पृथिवी ह्येष सर्वभूतान्तरात्मा ॥2.1.4॥**

अग्निः मूर्धा चन्द्रसूर्यौ चक्षुषी दिशः श्रोत्रे विवृताः वेदाः च वाग् वायुः प्राणः हृदयम् विश्वं अस्य पदभ्यां पृथिवी एषः सर्वभूतान्तरात्मा हि ॥

अग्निः अग्नि पु. प्र. ए. व.

मूर्धा मस्तक मूर्धन् पु. प्र. ए. व.

चन्द्रसूर्यौ चन्द्रसूर्य नपु. प्र. द्वि. व.

चक्षुषी डोळे चक्षुस् नपु. प्र. द्वि. व.

दिशः (सर्व) दिशा दिश् स्त्री. प्र. ब. व.

श्रोत्रे दोन कान श्रोतृ पु. च. ए. व.

विवृताः वाचा, विवरण करून सांगितलेले विवृत पु. प्र. ब. व.

वेदाः वेद पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

वाग् वाणी वाच् स्त्री. प्र. ए. व.

वायुः वायु पु. प्र. ए. व.

प्राणः प्राण पु. प्र. ए. व.

हृदयम् हृदय नपु. प्र. ए. व.

विश्वं विश्व नपु. प्र. ए. व.

अस्य याच्या इदम् नपु. ष. ए. व.

पदभ्यां पायापासून पद

पृथिवी  पृथिवी स्त्री. प्र. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

सर्वभूतान्तरात्मा सर्व भूतांचा आत्मा

सर्वभूतान्तरात्मन् पु. प्र. ए. व.

हि खरोखर अव्यय

आधीच्या मंत्रापासून प्रकृति च्या निरनिराळ्या अविष्काराची चर्चा करत असता अक्षरब्रह्म पासून पंचमहाभूते आणि प्राण मन आणि इन्द्रिये निर्माण होतात असे म्हटले आहे.

प्रकर्षेण करोति इति प्रकृतिः' अर्थात् जे (सृष्टीतील पुरुषाव्यतिरिक्त सर्व अन्य तत्त्वांना) उत्पन्न करते, ते तत्त्व म्हणजे प्रकृती होय. अक्षरब्रह्म पासून प्रकृतिची निर्मिती झाली. पुरूष आणि प्रकृति रूढार्थाने वेगळे असले तरी परमात्म्याचा अंश प्रत्येक गोष्टीत आहेच. हेच ह्या मंत्रात सांगितले आहे.

असौ वाव लोको गौतमाग्निस्तस्यादित्य एव समिद्रश्मयो धूमोऽहरर्चिश्चन्द्रमा अङ्गारा नक्षत्राणि विस्फुलिङ्गाः॥ छान्दोग्योपनिषद् 5.4.1।।

हे गौतम ! स्वर्ग अग्नि आहे, सूर्य त्याचे ईंधन आहे , किरणें धूर आहेत, दिवस ज्वाला आहेत, चंद्रमा अंगारे आणि तारे ठिणग्या.

अग्नी म्हणजे प्रकाश म्हणजेच ज्ञान.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

याचे अग्नी हे मस्तक, चन्द्र आणि सूर्य हे डोळे, सर्व दिशा म्हणजे कान, वेद हीच वाणी, वायु म्हणजे प्राण, सर्व विश्व हे त्याचे हृदय, पायांपासून पृथ्वी, हा खरोखर सर्व भूतांचा अंतरात्मा आहे.

**तस्मादग्निः समिधो यस्य सूर्यः सोमात् पर्जन्य ओषधयः पृथिव्याम्। पुमान् रेतः सिञ्चति योषितायां बह्वीः प्रजाः पुरुषात् संप्रसूताः ॥2.1.5।।**

तस्मात् अग्निः सूर्यः यस्य समिधः सोमात् पर्जन्यः पृथिव्याम् ओषधयः पुमान् योषितायां रेतः सिञ्चति पुरुषात् बह्वीः प्रजाः सम्प्रसूताः ॥

तस्मात् त्याच्यापासून तद् पु. पं. ए. व.

अग्निः  अग्नि पु. प्र. ए. व.

सूर्यः सूर्य पु. प्र. ए. व.

यस्य ज्याच्या यद् पु. ष. ए. व.

समिधः  समिधा पु. प्र. ए. व.

सोमात् चंद्रापासून सोम पु. पं. ए. व.

पर्जन्यः पर्जन्य पु. प्र. ए. व.

पृथिव्याम् पृथ्वीवर पृथिवी स्त्री. स. ए. व.

ओषधयः ओषधि स्त्री. प्र. ब. व.

पुमान् पुरूष पुंस् पु. प्र. ए. व.

योषितायां स्त्रीमध्ये योषिता स्त्री. स. ए. व.

रेतः वीर्य रेत पु. प्र. ए. व.

सिञ्चति शिंपण करतात सिच् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

पुरुषात् पुरुषापासून पुरुष पु. पं. ए. व.

बह्वीः पुष्कळ बह्वीः स्त्री. द्वि. ब. व.

प्रजाः  प्रजा स्त्री. प्र. ब. व.

सम्प्रसूताः उत्पन्न होतात सम+प्र+सू धातु क्त प्रत्यय स्त्री. प्र. ब. व.

दुसऱ्या मुण्डकातील पहिल्या खंडातील 3 र्या मंत्रापासून अक्षरब्रह्म पासून प्रकृति ची विविध अंगांची निर्मिती होण्याची प्रक्रिया सांगण्यास सुरुवात झाली आहे. ह्या मंत्रात अप्रत्यक्षपणे पंचाग्नि विद्येचा उल्लेख केला आहे. हिंदू धर्मातील मृत शरीराचे दहन करण्यामागील कारणमीमांसा ह्या मंत्राच्या निमित्ताने लक्षात येते. पंचाग्नि विद्या, पुनर्जन्माच्या सिद्धांतावर भाष्य करते. ह्या मंत्रात आकाश, पर्जन्य, पृथ्वी तसेच पुरुष आणि स्त्री ह्या पाच अग्नींचा उल्लेख केला आहे. छान्दोग्योपनिषदातील 6 व्या अध्यायातील 2र्या खंडातील 1-4 ह्या श्लोकात ह्यावर भाष्य केले आहे. पंचाग्नि विद्येचा गर्भित अर्थ असा आहे की अग्नी मध्ये कोणतीही वस्तू टाकली असता त्यातील पाण्याचा अंश उर्ध्वदिशेला(आकाश प्रथम अग्नी) म्हणजे परलोकात  जातो. ज्याचे रूपांतर पर्जन्यात (द्वितीय अग्नी) होऊन पृथ्वीवर (तृतीय अग्नी) त्याचा वर्षाव होऊन अन्नात रूपांतर होते. ह्या अन्नाच्या पोषणाने पुरुष (चतुर्थ अग्नी) आणि स्त्री (पंचम अग्नी) निर्माण होऊन पुनरुत्पादन चालू राहते.

खालील दोन मंत्रात  गंमतशीर पद्धतीने ह्याचे वर्णन केले आहे.

तदैक्षत् बहु स्यां प्रजायेयति तत्तेजोऽसृजत् तत्तेज् अक्षत् बहु स्यां प्रजायेयति तदपोऽसृजत्। तस्माद्यत्र क्वच शोचति स्वेदते वा पुरुषस्तेजस एव तदध्यापो जायन्ते ॥ छान्दोग्योपनिषद् 6.2.3 ॥

त्या अस्तित्वाने ठरवले ‘मी पुन्हा जन्म घेईन, मग त्याने आग तयार केली, त्या आगीने सुद्धा ठरवले ‘मी वाढत जाईन, पुन्हा जन्म घेईन ’ मग आगीने पाणी तयार केले. म्हणूनच शोक व्यक्त करताना अश्रू ढाळतात आणि घाम फुटतो.

ता आप ऐक्षन्त भाव्यः स्याम प्रजायेमहिति तां अन्नमसृजन्त तस्माद्यत्र क्व च वर्षति तदेव भूयिष्ठमन्नं भवत्यद्भ्य एव तदध्यन्नद्यं जायते ॥ छान्दोग्योपनिषद् 6.2.4 ॥

त्या पाण्याने ठरवले ‘मी वाढेन; परत जन्म घेईन.’ पाण्याने भोजन बनवले.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

त्यापासून आकाशाची निर्मिती होते ज्यामधे सूर्याच्या समिधा पडतात. चंद्रापासून पर्जन्याची निर्मिती. पर्जन्यामुळे पृथ्वीतलावर निरनिराळ्या वनस्पतींची निर्मिती होते. ह्या वनस्पतींमुळे पुरुष आणि स्त्री. पुरुषाने आपले बीज स्त्री मध्ये स्थापित केल्यानंतर अनेक प्रजा निर्माण होतात.

**तस्माद्दचः साम यजूंषि दीक्षा यज्ञाश्च सर्वे क्रतवो दक्षिणाश्च।संवत्सरश्च यजमानश्च लोकाः सोमो यत्र पवते यत्र सूर्यः ॥2.1.6।।**

तस्मात् ऋचः साम यजूंषि दीक्षाः सर्वे यज्ञाः च क्रतवः दक्षिणाः च सम्वत्सरः च यजमानः लोकाः च उत्पन्नाः यत्र सोमः यत्र सूर्यः पवते ॥

तस्माद् तद् पु. पं. ए. व.

ऋचः ऋच् स्त्री. प्र. ब. व.

साम सामन् नपु. प्र. ए. व.

यजूंषि यजूष् नपु. प्र. ब. व.

दीक्षा दीक्षा स्त्री. प्र. ए. व.

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

यज्ञाः यज्ञ पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

क्रतवः क्रतु पु. प्र. ब. व.

दक्षिणाः  दक्षिणा स्त्री. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

संवत्सरः संवत्सर पु. प्र. ए. व.

यजमानः यजमान पु. प्र. ए. व.

लोकाः लोक पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

यत्र जेथे यद् + त्रल् अव्यय

सोमः सोम पु. प्र. ए. व.

यत्र जेथे यद् + त्रल् अव्यय

सूर्यः सूर्य पु. प्र. ए. व.

पवते पू धातु पवित्र करणे भ्वादि कर्तरि लट् लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

आधीच्या मंत्रात स्त्री पुरुष संयोगातून निर्माण होणारे जीव आणि पर्जन्यामुळे अन्नधान्याची व्यवस्था त्याने निर्माण केली असे वाचले. आता ह्या मंत्रात मनुष्याच्या ज्ञान प्राप्तीची व्यवस्था कशाप्रकारे केली आहे ते सांगितले आहे.

हे दोन मंत्र वाचताना पारशी लोकांचा धर्मग्रंथ अवेस्ता मध्ये नमूद केल्याप्रमाणे आहूर माझदा ने ही सृष्टी

निर्माण केली याची आठवण होते. फारशी धर्मामध्ये

अग्नि आणि पाणी या दोन तत्त्वांना अत्यंत महत्त्व आहे. अग्यारी मध्ये पवित्र अग्नी कायम प्रज्वलित केलेला असतो. ऋग्वेद आणि अवेस्ता यांच्यातील भाषेमध्ये बरेच साम्य आढळते असे म्हणतात.

ह्या मंत्रात बरेचसे अनोळखी शब्द वापरले आहेत त्यांचे अर्थ समजून घ्यायला हवे.

ऋचा' ह्या शब्दाची व्युत्पत्ति 'ऋक्' ह्या धातूपासून झाली ज्याचा अर्थ आहे 'प्रशंसा करणे'. ऋचा म्हणजे वेदांमधील पद्यात्मक मंत्र. शंकरभाष्य आणि आपटे यांच्या शब्दकोशाप्रमाणे जी रचना छंदात्मक आणि ऊंच स्वरात म्हटली जाते त्या ऋचा. मात्र छंदात्मक असून ज्याचा जप केला जातो ते सामन् (साम).

यजुर्वेदातील गद्य म्हणजे यजूष्. इज्यतेसनेनेति यजुः' म्हणजे ज्या मंत्रांच्या पठणाने यज्ञ केला जातो, ते यजुष्.

दीक्षा आणि सामान्य शिक्षण ह्यामधील फरक असा - शिक्षण सर्वजण घेतात मात्र दीक्षा देताना गुप्तता पाळण्यात येते.

शिक्षणाने साक्षरता येते दीक्षेने गुरूकृपा होते जीवन सार्थकी लागते.

शिक्षण व्यावहारिक गोष्टींचे दिले जाते. दीक्षा म्हणजे योगाभ्यास, नामस्मरण, गुरुमंत्र वगैरे. शिक्षक अनेक असू शकतात. मात्र दीक्षा देणारे गुरू आजीवन गुरु असतात.

क्रियतेऽसौ इति। कृ धातु + "कृञः क्तुः" =क्रतु. म्हणजे बलिदान. स्वार्थत्याग

संवत्सर साधारणपणे एक वर्षाचे मानले जाते.

सम्यक् वसन्ति मासादया:अस्मिन् (ज्यात मास आदी विभाग व्यवस्थित सामावतात त्याला संवत्सर असे म्हणतात.

'स वसन्ति ऋतवौ यत्र' असे सुद्धा म्हटले आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

'त्या' च्या पासून वैदिक ऋचा, छन्दोबद्ध कवने, यजुर्वेदातील यज्ञ पद्धती, गुरूंकडून प्राप्त झालेले उपदेश, बळी, दक्षिणा आणि सर्व यज्ञविधी, यज्ञकाल, यज्ञकर्ता तसेच जे सूर्य चंद्राकडून पवित्र केले जातात असे लोक उत्पन्न झाले.

**तस्माच्च देवा बहुधा संप्रसूताः साध्या मनुष्याः पशवो वयांसि। प्राणापानौ व्रीहियवौ तपश्च श्रद्ध सत्यं ब्रह्मचर्यं विधिश्च ॥2.1.7।।**

तस्मात् च देवाः बहुधा साध्याः मनुष्याः पशवः वयांसि प्राण अपानौ व्रीहियवौ तपः च श्रद्धा सत्यम् ब्रह्मचर्यम् विधिः च सम्प्रसूताः ॥

तस्मात् त्यापासून तद् पु. पं. ए. व.

च सुद्धा अव्यय

देवाः देव पु. प्र. ब. व.

बहुधा विविध अव्यय

साध्याः साधुगण साध्य पु. प्र. ब. व.

मनुष्याः मनुष्य पु. प्र. ब. व.

पशवः पशु पु. प्र. ब. व.

वयांसि पक्षी वयस् नपु. प्र. ब. व.

प्राण-अपानौ प्राण-अपानवायू प्राण-अपान पु. प्र. द्वि. व.

व्रीहियवौ तांदूळ आणि जव व्रीहिश्च यवश्च पु. प्र. द्वि. व.

तपः तप पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

श्रद्धा श्रद्धा स्त्री. प्र. ए. व.

सत्यम् सत्य नपु. प्र. ए. व.

ब्रह्मचर्यम् ब्रह्मचर्य नपु. प्र. ए. व.

विधिः नैतिक मूल्य विधि पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

सम्प्रसूताः उत्पन्न होतात सम+प्र+सू धातु क्त प्रत्यय स्त्री. प्र. ब. व.

सूक्ष्मापासून स्थूलाच्या निर्मिती चा प्रवास असे ह्या मंत्राचे वर्णन करता येईल. आधीच्या मंत्रात ह्या सृष्टीतील घटकांना सूर्य आणि चंद्र पवित्र करतात असे म्हटले होते. सूर्याशिवाय आपले जीवन अशक्य आहेच पण चंद्राचा प्रभाव सुद्धा तितकाच महत्त्वाचा आहे.

पंचमहाभूतांचे जे निरनिराळे स्वामी आहेत त्यांना देवता असे म्हणतात.

ह्या सृष्टीमध्ये मनुष्यप्राणी, निरनिराळे पशू पक्षी निर्माण झाले तसेच त्यांच्यासाठी भरणपोषण करणाऱ्या वनस्पती निर्माण झाल्या. त्यानंतर संस्कृती चा उदय झाला ज्यामधे तप, सत्य, श्रद्धा ब्रह्मचर्य आणि नैतिकता अशी मूल्ये निर्माण झाली.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

आणि त्यापासून विविध देवता, साधुगण, मनुष्य, पशू, पक्षी, प्राण अपान वायू, तांदूळ आणि जव यासारखी धान्ये, तपश्चर्या, श्रद्धा सत्य, ब्रह्मचर्य आणि नैतिकता सारखी मूल्ये निर्माण झाली.

**सप्त प्राणाः प्रभवन्ति तस्मात् सप्तार्चिषः समिधः सप्त होमाः। सप्त इमे लोका येषु चरन्ति प्राणा गुहाशया निहिताः सप्त सप्त ॥2.1.8।।**

तस्मात् सप्त प्राणाः सप्त अर्चिषः सप्त समिधः होमाः इमे सप्त लोकाः प्रभवन्ति सप्त सप्त येषु निहिताः गुहाशयाः प्राणाः चरन्ति ॥

तस्मात् तद् पु. पं. ए. व.

सप्त सप्तन् प्र. ब. व.

प्राणाः प्राण पु. प्र. ब. व.

सप्त सप्तन् प्र. ब. व.

अर्चिषः ज्वाला अर्चिष् नपु. पं. ए. व.

सप्त सप्तन् प्र. ब. व.

समिधा इन्द्रिय विषय समिध् पु. तृ. ए. व.

होमाः आहुती होम पु. प्र. ब. व.

इमे हे इदम् पु. प्र. ब. व.

सप्त सप्तन् प्र. ब. व.

लोकाः लोक पु. प्र. ब. व.

प्रभवन्ति निर्माण होतात प्र+भू धातू असणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

सप्त सप्त सप्तन् प्र. ब. व.

येषु ज्यामधे यद् पु. स. ब. व.

निहिताः स्थापित नि+धा धातु धारण करणे क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

गुहाशयाः गुहेत विसावलेले गुहा+शी धातु शयन करणे अच् प्रत्यय पु. प्र. ब. व.

प्राणाः प्राण पु. प्र. ब. व.

चरन्ति फिरतात चर् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

हा मंत्र वाचताक्षणी सात ह्या संख्येचे विशेष महत्त्व लक्षात येते. ह्या मंत्रात सात प्राण, सात ज्वाळा, सात समिधा, सप्त होम किंवा आहुती आणि सात लोक यांचा उल्लेख केला आहे. ह्या सात गोष्टींचा गर्भित अर्थ समजावून घ्यायला हवा.

आपल्याला सप्त सूर, सात नद्या (गंगा, यमुना, सरस्वती, सिंधू, नर्मदा, गोदावरी आणि कावेरी) सप्तपदी, इंद्रधनुष्याचे 7 रंग, 7 ग्रह, 7 समुद्र, , सूर्याचे 7 घोड़े, आठवड्याचे 7 दिवस माहीत असतात.

अन्नमय प्राणमय मनोमय ज्ञानमय विज्ञानमय चित्तमय आत्मामय असे सात कोष आपल्या शरीरात आहेत. मुण्डकोपनिषदातील 1.2.4 ह्या मंत्रात आपण सात प्रकारच्या ज्वाळांचे वर्णन वाचले होते.

स॒प्तऽऋष॑यः॒ प्रति॑हिताः॒ शरी॑रे स॒प्त र॑क्षन्ति॒ सद॒मप्र॑मादम्।स॒प्तापः॒ स्वप॑तो लो॒कमी॑यु॒स्तत्र॑ जागृतो॒ऽअस्व॑प्नजौ सत्र॒सदौ॑ च दे॒वौ ॥ (यजुर्वेद 34.55)

आपल्या शरीरात सात प्राण म्हणजे सात ऋषि आहेत. हे सतत कार्यरत राहून आपल्या शरीराचे रक्षण करतात. निद्रा स्थिती मध्ये सुद्धा हे सात लोकांत जागृत अवस्थेत राहून निरंतर सजीवांची रक्षा करत असतात.

सात लोक म्हणजे आपली सात इन्द्रिये, ज्ञानेन्द्रिये दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या आणि जीभ ज्यायोगे आपल्याला शब्द, रस गंध स्पर्श आणि रूप ह्यांचे आकलन होते. ह्यांना सात गुहा असे मानले तर त्या सर्वांमध्ये प्राणशक्ती चा संचार चालू असतो.

अशा एकेक गुहेत एकेक प्राण म्हणजे सात प्राण आहेत. जणू प्राण यज्ञच चालू आहे ज्यामधे सात प्रकारच्या समिधा पडत आहेत. ह्या आहुतींमुळे सात प्रकारच्या ज्वाळा म्हणजे ज्ञानप्राप्ती होत आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

त्याच्यापासून सात लोक, सात ज्वाला, समिधा, सात होम आणि त्यात फिरणारे सात प्राण निर्माण होतात जे साती इन्द्रिय रूपी गुहांमध्ये स्थापित होऊन विहरत असतात.

**अतः समुद्रा गिरयश्च सर्वेऽसमात् स्यन्दन्ते सिन्धवः सर्वरूपाः।अतश्च सर्वा ओषधयो रसश्च येनैष भूतैस्तिष्ठते ह्यन्तरात्मा॥ 2.1.9।।**

अतः सर्वे समुद्राः गिरयः च अस्मात् सर्वरूपाः सिन्धवः स्यन्दन्ते। अतः च सर्वाः ओषधयः रसः च येन एषः अंतरात्मा भूतैः  तिष्ठते हि ॥

अतः त्यापासून अव्यय एतद् +तासिल प्रत्यय

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

समुद्राः समुद्र पु. प्र. ब. व.

गिरयः पर्वत गिरि पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

अस्मात् त्यापासून इदम् पु. पं. ए. व.

सर्वरूपाः सर्व प्रकारच्या सर्वरूप पु. प्र. ब. व.

सिन्धवः नद्या सिन्धु स्त्री. प्र. ब. व.

स्यन्दन्ते वाहतात स्यन्द् धातु पसरणे भ्वादिः कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

अतः त्यापासून अव्यय एतद् +तासिल प्रत्यय

च सुद्धा अव्यय

सर्वाः सर्व पु. प्र. ब. व.

ओषधयः वनस्पती ओषधि स्त्री. प्र. ब. व.

रसः रस पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

येन ज्याने यद् पु /नपु. तृ ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

अंतरात्मा अंतरात्मन् पु. प्र. ए. व.

भूतैः पंचमहाभूतांनी भूत नपु. तृ ब. व.

तिष्ठते राहतो स्था धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

हि खरोखर अव्यय

हा मंत्र श्रीमद्भगवद्गीतेच्या 7 व्या अध्यायातील 8 व्या आणि 9 व्या श्लोकाशी समांतर आहे. त्यामध्ये सुद्धा परमेश्वराच्या अस्तित्वाचे वर्णन केले आहे. आधीच्या मंत्रात निरनिराळ्या इन्द्रिय रूपी गुहांमध्ये प्राण वसलेले असतात असे म्हटले होते. आता आपल्या आजुबाजुला असलेल्या वातावरणाचे वर्णन केले आहे. बारमाही वाहणाऱ्या नद्या, त्यांचे  उगमपर्वत , पाण्यामुळे वाढणारे निरनिराळे वृक्ष आणि वनस्पती हे सर्व 'त्या ' नेच निर्माण केले आहे. हे सांगताना अंतरात्मा असा शब्द वापरला आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की याच्यापासून सर्व समुद्र आणि पर्वत निर्माण झाले. निरनिराळ्या वर्णनांच्या नद्या यापासून प्रवाहित होतात. सर्व औषधी आणि षड्रसांच्या योगाने हा अंतरात्मा वेढलेला असतो.

## पुरुष एवेदं विश्वं कर्म तपो ब्रह्म परामृतम्। एतद्यो वेद निहितं गुहायां सोऽविद्याग्रन्थिं विकिरतीह सोम्य ॥2.1.10।।

इदं विश्वं कर्म तपः च पुरुषः एव गुहायाम् निहितं परामृतम् एतत् ब्रह्म यः वेद सोम्य सः अविद्याग्रन्थिम् इह विकिरति ॥

इदं हे इदम् नपु. प्र. ए. व.

विश्वं विश्व नपु. प्र. ए. व.

कर्म कर्मन् नपु. प्र. ए. व.

तपः तपस् नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

पुरुषः पुरुष पु. प्र. ए. व.

एव च अव्यय

गुहायाम् गुहेमध्ये गुहा स्त्री. स. ए. व.

निहितं दडलेले निहित नपु. प्र. ए. व.

परामृतम् श्रेष्ठ अमृत परामृत नपु. प्र. ए. व.

एतत् हे एतद् नपु. प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

यः जो यद् पु. प्र. ए. व.

वेद

हे सोम्य

सः तो तद् पु. प्र. ए. व.

अविद्याग्रन्थिम् अविद्याग्रन्थि पु. द्वि. ए. व.

इह येथे अव्यय

विकिरति सोडतो वि+कृ धातु फेकून देणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

आतापर्यंतच्या मंत्रांतून ह्या विश्वाची उत्पत्ती आणि त्याचे निरनिराळे अविष्कार 'पुरुषा' पासून निर्माण झाले असे नमूद केले आहे. मानवी उत्पादन आणि मानवी शरीराची अचूक निर्मिती त्याचबरोबर मानवी संस्कृती आणि मूल्यांची निर्मिती आणि ज्ञान प्राप्तीची सोय असे सर्व पैलू ह्यांची चर्चा झाली. आता ह्या खण्डातील हा शेवटचा मंत्र एक सारांश ह्या स्वरुपाचा.

आपल्या आयुष्यात अज्ञान हा सर्वात मोठा अडथळा. अविद्येच्या गाठी सोडवत जाणे म्हणजे ज्ञान प्राप्ती. निरीक्षण, अनुभव आणि गुरूकृपा ह्यामुळे आपण घडत जातो. आपले अंतिम लक्ष्य 'त्या' प्राप्ती आणि मोक्ष.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

हे सोम्य! ' पुरुष ' म्हणजेच हे सर्व विश्व आहे. तो म्हणजेच कर्म, तप, श्रेष्ठ अविनाशी ब्रह्म. हे ब्रह्म आपल्या हृदयामध्यें स्थित आहे असें जो जाणतो तोच अविद्येच्या गाठी सोडवून टाकतो.

--------------------- ---------------------------------------------------------------------------------------------

## मुण्डकोपनिषद् 2.2.1-11

**आविः सन्निहितं गुहाचरं नाम महत् पदमत्रैतत् समर्पितम्।**

**एजत् प्राणन्निमिषच्च यदेतज्जानथ सदस-द्वरेण्यं परं विज्ञानाद्यद्वरिष्ठं प्रजानाम् ॥2.2.1।।**

आविः सन्निहितं गुहाचरं नाम यत् महत् पदम् अत्र एजत् प्राणत् निमिषत् च एतत् सर्वं समर्पितम् एतत् जानथ यद् सत् असत् वरेण्यम् वरिष्ठं प्रजानां विज्ञानात् परम् ॥

आविः तेजस्वी आविस् पु. द्वि. ए. व.

उ धातु अवते आवाज करणे

सन्निहितं निकटस्थित सं+नि +धा धातु धारण करणे क्तः प्रत्यय नपु. द्वि. ए. व.

गुहाचरं गुहेत विचरण करणारे गुहा+चर धातु अच् प्रत्यय नपु. प्र. ए. व.

नाम नावाचे नामन् नपु. प्र. ए. व.

यत् जे यत् नपु. प्र. ए. व.

महत् महान महत् नपु. प्र. ए. व.

पदम् स्थान पद पु. द्वि. ए. व.

अत्र येथे अव्यय

एजत् चलित एजत् नपु. प्र. ए. व.

एज् धातु कम्पन होणे

शतृ प्रत्यय

प्राणत् श्वासोच्छ्वास प्र+अण् धातु जगणे भ्वादिः  कर्तरि लङ् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

निमिषत् पापण्यांची हालचाल नि+मिष् धातु शिंपडणे तुदादिः शतृँ प्रत्यय नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

एतत् हे एतद् नपु. प्र. ए. व.

सर्वं सर्व पु. द्वि. ए. व.

समर्पितम् समर्पित नपु. द्वि. ए. व.

एतत् हे एतद् नपु. प्र. ए. व.

जानथ जाण ज्ञा धातु (आर्ष) लोट् लकार मध्यम पु. ए. व.

यद् जे यद् नपु. प्र. ए. व.

सत् व्यक्त सत् नपु. प्र. ए. व.

असत् अव्यक्त अ+सत् नपु. प्र. ए. व.

वरेण्यम् पूजनीय वरेण्य नपु. द्वि. ए. व.

वृ धातु सेवा करणे

वृञ+ एण्यः

वरिष्ठं श्रेष्ठ वरिष्ठ पु. द्वि. ए. व.

प्रजानां प्रजा स्त्री. ष. ब. व.

विज्ञानात् बुद्धिच्या विज्ञान नपु. पं. ए. व.

परम् पलिकडे पर नपु. द्वि. ए. व.

मुण्डकोपनिषदातील 2 ऱ्या मुण्डकातील 2ऱ्या खण्डातील प्रथम मंत्राची सुरवात परमात्म्याच्या विस्तृत वर्णनापासून झाली आहे. हा मंत्र वाचला की डोक्यात प्रकाश पडणे ह्या शब्दप्रयोगाची आठवण येते.

आपल्या अध्यात्मिक साहित्यात ज्ञानाला प्रकाशाची उपमा नेहमीच दिली जाते. ह्या मंत्रातील आविः शब्दाचा अर्थ तोच दैदीप्यमान, तेजोमय. आपल्या सर्वांनाच माहित असलेला प्रकाशाचा स्त्रोत म्हणजे सूर्य, ज्याच्याशिवाय आपण जगू शकत नाही. ह्याच शब्दापासून ह्या मंत्राची सुरवात झाली आहे. 2.1.8 ह्या मंत्रात आपण सात लोक त्यामधे असणारे सात प्राण यांना गुहा असे संबोधून त्यामध्ये प्राणशक्ती चा संचार चालू असतो असे वाचले. ह्यांना ज्ञानेन्द्रिये का म्हणायचे याचा अर्थ ह्या मंत्रात सापडतो. 2.1.5 व्या मंत्रात चंद्र आणि सूर्य हे परमात्म्याचे डोळे आहेत असे म्हटले होते तर पर्जन्य चक्र समजावून सांगताना त्यात सूर्याच्या समिधा पडतात असे म्हटले होते. स्वयंप्रकाशी सूर्यामुळे आपण मूर्त स्वरूपात गोष्टी पाहू शकतो ते केवळ डोळ्यांच्या साह्याने. ज्याचे ज्ञान आपल्या मनापर्यंत पोहोचते. तीच गोष्ट कानांची  नाकाची आणि जीभेची. मन आणि बुद्धि च्या साह्याने आपण ज्ञान ग्रहण करतो. नाहीतर सर्व इन्द्रिये असून सुद्धा आपण रिक्तच राहतो. ह्या सर्वांची जाणीव करून देणारा तोच आहे. एजत् प्राणत् निमिषत् ह्या क्रिया चैतन्यरूपी आहेत. आपला श्वासोच्छ्वास आपल्या जीवंत असण्याची खूण तर पापण्यांची हालचाल हे मूक संवादाचे माध्यम आहे. असा संवाद फक्त समजून घेता येतो. विज्ञानाच्या माध्यमातून हे सर्व सिद्ध करता येत नाही. विज्ञानाच्या याच मर्यादा आहेत.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

तेजस्वी, अत्यंत निकट, हृदयाच्या गुहेत विचरण करणारे, श्रेष्ठ, सर्वांचा आधारवड, जिथे सर्व विश्वच समर्पित झाले आहे, जे चल आहे, श्वास उत्छ्वास, नेत्रांची उघडझाप करणारे असे अव्यक्त आणि व्यक्त सुद्धा आहे, अतिशय पूजनीय, सर्वश्रेष्ठ आणि सामान्य बुद्धिला सहज आकलन न होणारे, त्याला (तू) जाणून घे.

**यदर्चिमद्यदणुभ्योऽणु च यस्मिंल्लोका निहिता लोकिनश्च।**

**तदेतदक्षरं ब्रह्म स प्राणस्तदु वाङ्‌ मनः तदेतत् सत्यं तदमृतं तद् वेद्धव्यं सोम्य विद्धि ॥ 2.2.2।।**

यद् अर्चिमत् यद् अणुभ्यः  अणु च यस्मिन् लोकाः लोकिनः च निहिताः तद् एतद् अक्षरं ब्रह्म सः प्राणः तद् उ वाक् मनः तद् एतद् सत्यम् तद् अमृतम् तद्  वेद्धव्यम् सौम्य विद्धि ॥

यद् जे यद् नपु. प्र. ए. व.

अर्चिमत् प्रकाशमान अर्च् धातु पूजा करणे मतुप प्रत्यय

यद् जे यद् नपु. प्र. ए. व.

अणुभ्यःअणु अणूपेक्षा सूक्ष्म अणु पु. पं. ब. व.

अण+उन्

च सुद्धा अव्यय

यस्मिन् ज्यामध्ये यद् पु. स. ए. व.

लोकाः लोक लोक पु. प्र. ब. व.

लोकिनः रहिवासी लोकिन् पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

निहिताः स्थित निहिता स्त्री. प्र. ब. व.

नि+धा धातु धारण करणे + क्त प्रत्यय

तद् ते तद् नपु. प्र. ए. व.

एतद् हे एतद् नपु. प्र. ए. व.

अक्षरं अविनाशी अक्षर नपु. प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

प्राणः प्राण पु. प्र. ए. व.

तद् उ तेच तद् नपु. प्र. ए. व.

उ+क्विप्+तुक् न

वाक् वाणी वाच स्त्री. प्र. ए. व.

मनः मन मनस् नपु. प्र. ए. व.

तद् ते तद् नपु. प्र. ए. व.

एतद् हे एतद् नपु. प्र. ए. व.

सत्यम् सत्य  नपु. प्र. ए. व.

तद् ते तद् नपु. प्र. ए. व.

अमृतम् अमृत नपु. प्र. ए. व.

तद् ते तद् नपु. प्र. ए. व.

वेद्धव्यम् वेध घ्यावा असे विध् धातु

हे सौम्य!

विद्धि वेध घे विद् धातु कर्तरि लोट्लकारः म. पु. ए. व.

आधीच्या मंत्रातील आविस् या शब्दाचा अर्थ आणि ह्या मंत्रातील अर्चिमत् हे दोन्ही सारखेच. सुरुवातीला शौनक ऋषींनी विचारलेल्या प्रश्नावर अंगिरस ऋषींनी परा विद्या आणि अपरा विद्या ह्यामधील फरक सांगितला होता, त्याचा श्रीमद्भगवद्गीतेतील ज्ञानयोगाशी संबंध जोडता येईल. व्यक्त आणि अव्यक्त अशा परमतत्त्वाची ओळख करून देता देता आपल्याला आपल्या चेतनाशक्ती ची जाणीव ह्या मंत्राच्या निमित्ताने करून दिली जाते आहे.

अणोरणीयान्महतो महीयानात्मास्य जन्तोर्निहितो गुहायाम्।

तमक्रतुः पश्यति वीतशोको धातुप्रसादान्महिमानमात्मनः ॥ कठोपनिषद् 1.2.20

सूक्ष्माहून सूक्ष्म, महान पेक्षा महान, प्रत्येक जीवाच्या हृदयात आत्मा वास करत असतो. जो पुरुष कामना रहित होऊन आपले मन आणि इन्द्रिये संयमित ठेवून ह्या आत्म्याला अनुभवतो तो सर्व दुःखातून मुक्त होतो.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

जो तेजस्वी आहे, सूक्ष्माहून सूक्ष्म आहे, ज्यामधे निरनिराळे लोक स्थित आहेत, तेच हे शाश्वत ब्रह्म आहे, तेच प्राण, तेच वाचा आणि तेच मन सुद्धा आहे. तेच हे सत्यतत्व, जे कधीच नष्ट न होणारे, असे ते जाणून घेण्याजोगे आहे. हे सोम्य! त्याला तू जाण.

**धनुर्गृहीत्वौपनिषदं महास्त्रं शरं ह्युपासानिशितं सन्धयीत। आयम्य तद् भावगतेन चेतसा लक्श्यं तदेवाक्षरं सोम्य विद्धि ॥ 2.2.3।।**

औपनिषदं महास्त्रं धनुः गृहित्वा उपासानिशितम् हि शरं सन्धयीत सोम्य तद्भावगतेन चेतसा आयम्य तद् एव अक्षरं लक्ष्यं विद्धि ॥

औपनिषदं उपनिषदातील औपनिषद पु. द्वि. ए. व.

महास्त्रं महान अस्त्र महत्अस्त्र नपु. द्वि. ए. व.

धनुः धनुष्य धनुष् नपु. प्र. ए. व.

गृहित्वा घेऊन ग्रह् धातु स्वीकार करणे क्त्वा प्रत्यय

उपासानिशितम् उपासनेमुळे धारदार उपासा+निशित

उपासा स्त्री. प्र. ए. व.

उप+अस् धातु चमकणे अच् प्रत्यय

नि+शि धातु तीक्ष्ण करणे +क्तः नपु प्र. ए. व.

हि खरोखर अव्यय

शरं बाण शर पु. द्वि. ए. व.

सन्धयीत जोडून (सं+धा धातु धारण करणे +अङ्)

हे सोम्य

तद्भावगतेन ( ब्रह्म) भावनेने तद्भावगत पु. तृ. ए. व.

तद्+भाव+गम् धातु क्त प्रत्यय

चेतसा चित्ताने चेतस् नपु. तृ. ए. व.

आयम्य ओढून अव्यय आङ्+यम् धातु +ल्यप् प्रत्यय

तद् एव तेच अव्यय

अक्षरं अविनाशी अक्षर नपु. प्र. ए. व.

लक्ष्यं  लक्ष्य नपु. प्र. ए. व.

विद्धि जाण विद् धातु जाणणे कर्तरि लोट्लकारः परस्मैपदम् म. पु. ए. व.

अचूक ज्ञानामुळे आपला आत्मविश्वास वाढतो. एखाद्या अटीतटीच्या प्रसंगी ज्ञानाची खूप मदत होती. प्रखर ज्ञानी व्यक्तीकडे विशेष आदराने पाहिले जाते.

उपनिषदातील ज्ञानाचे माहात्म्य सांगताना धनुर्विद्या हे रूपक म्हणून वापरले आहे. सूर्याच्या प्रखर तेजाला  तळपणारी किरणे म्हटले जाते तर धारदार तलवारीला सुद्धा तळपणारी तलवार म्हटले जाते. ह्या मंत्रात असे म्हटले आहे की

हे सोम्य! उपनिषदामुळे मिळालेले (ज्ञानरूपी) महान अस्त्र म्हणजे धनुष्य हातात घेऊन त्याला उपासनेमुळे तीक्ष्ण झालेला असा बाण जोडून,( ब्रह्म हे लक्ष्य ठेवून) त्यावर मन एकाग्र करून, अक्षर ब्रह्माचा वेध घे.

**प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते। अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत् तन्मयो भवेत् ॥2.2.4।।**

प्रणवः धनुः शरः हि आत्मा ब्रह्म तत् लक्ष्यम् उच्यते अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत् तन्मयः भवेत् ॥

प्रणवः ॐकार पु. प्र. ए. व.

धनुः धनुष् नपु. प्र. ए. व.

शरः बाण शर पु. प्र. ए. व.

हि खरोखर अव्यय

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

लक्ष्यम् लक्ष्य नपु. प्र. ए. व.

उच्यते म्हणतात ब्रू धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

अप्रमत्तेन सावधपणे अ+प्र+मद् धातु हर्षित होणे + क्तः प्रत्यय पु. तृ. ए. व.

वेद्धव्यं वेध घ्यावा असे विध् धातु

शरवत् बाणाप्रमाणे शर बाण

तन्मयः एकरूप तन्मय पु. प्र. ए. व.

तद्+मयः मय् धातु अचि प्रत्यय

भवेत् होवो भू धातु होणे कर्तरि विधिलिङ् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

ह्या मंत्रात आधीच्या मंत्रात उल्लेख केलेले, धनुष्य म्हणजे काय ते समजावून सांगितले आहे. धनुर्विद्येचा उपयोग खरे तर दुर्जन आणि शत्रू पासून बचाव करण्यासाठी होतो पण इथे मात्र थेट परमात्म्याचे लक्ष्य साधण्यासाठी धनुष्यबाण हे रूपक वापरले आहे. धनुर्विद्या हा खूप मोठा विषय आहे. त्यातील तांत्रिक गोष्टींची चर्चा टाळून प्रणव म्हणजे ॐकाराच्या मंत्राचा उद्घोष म्हणजे धनुष्य. असे म्हटले आहे. ॐ हे अक्षर आणि धनुष्याचा आकार ह्यात बरेच साम्य आहे. धनुर्विद्येत एकाग्रता आणि स्थिरता फार महत्वाची. अचूक वेध घेताना छातीची सुद्धा हालचाल म्हणजे श्वास रोखून धरला जातो. ब्रह्माचा वेध घेण्याचा सुद्धा तीव्र ध्यास असायला हवा. बाण दोरीला लावून, दोरी मागे खेचून बाण लक्ष्याच्या दिशेने सोडायचा ह्या क्रियांशी बराच कल्पनाविलास करता येईल कारण येथे आत्मा हाच बाण आहे. आणि तो ब्रह्माला भेदायचा आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

प्रणव धनुष्य आहे तर आत्मा बाण आहे आणि ब्रह्म हेच लक्ष्य. सावधतेने लक्ष्याचा वेध घेतला असता जसे बाण लक्ष्याचा वेध घेतो त्याप्रमाणे ब्रह्माशी एकरूप व्हावे.

**यस्मिन् द्यौः पृथिवी चान्तरिक्षमोतं मनः सह प्राणैश्च सर्वैः। तमेवैकं जानथ आत्मानमन्या वाचो विमुञ्चथामृतस्यैष सेतुः ॥2.2.5।।**

यस्मिन् द्यौः पृथिवी अन्तरिक्षम् च सर्वैः प्राणैः सह मनः च ओतम् तम् एकं आत्मानम् एव जानथ अन्या वाचः विमुञ्चत। एषः अमृतस्य सेतुः ॥

यस्मिन् ज्यामध्ये यद् नपु. स. ए. व.

द्यौः स्वर्ग द्यो स्त्री. प्र. ए. व.

पृथिवी पृथ्वी पृथिवी स्त्री. प्र. ए. व.

अन्तरिक्षम् अन्तरिक्ष नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

सर्वैः सर्व नपु. तृ. ब. व.

प्राणैः प्राण नपु. तृ. ब. व.

सह अव्यय

मनः मनस् पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

ओतम् सर्वसमावेशक आङ्+उ धातु+क्त प्रत्यय भ्वादिः नपु. प्र. ए. व.

तम् ते तद् पु. द्वि. ए. व.

एकं एक नपु. प्र. ए. व.

आत्मानम् आत्मा आत्मन् पु. द्वि. ए. व.

एव सुद्धा अव्यय

जानथ जाण ज्ञा धातु आर्ष लोट्लकारः म. पु. ए. व.

अन्या अन्या स्त्री. प्र. ए. व.

वाचः वच् धातु बोलणे +णिच् +अच्  प्रत्यय पु. प्र. ए. व.

विमुञ्चत सोडून दे वि+मुच् धातु कर्तरि लोट् लकार परस्मैपदी म. पु. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

अमृतस्य अमृततत्वाचा अमृत नपु. ष. ए. व.

सेतुः सेतु पु. प्र. ए. व.

आधीच्या मंत्रात परमात्म्याला आपल्या आत्मारूपी बाणाने लक्ष्य करायला सांगितले होते त्याचा उद्देश ह्या मंत्रात सांगितला आहे. अमरत्वाची प्राप्ती हाच तो हेतू. हे लक्ष्य साधताना काही अडथळे समोर असणार आहेत, ते पार करून जायचे आहे. आपल्याला 'अथर्व' व्हायचे आहे. श्रीमद्भगवद्गीतेतील 7.12 व्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की सर्व गुण जरी हे माझ्यामुळेच निर्माण झाले असले तरी मी त्यामधे नसतो. जसे एका बीजापासून झाड पाने फुले निर्माण होतात पण त्यामध्ये बीज दिसून येत आहे. परमेश्वराचे निर्गुण निराकार रूपाचे अंश मन बुद्धी अहंकार यारूपात आपल्यामध्ये असतातच. त्या सर्वांना भेदून आपल्याला आपले लक्ष्य गाठायचे आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

स्वर्ग, पृथ्वी,अंतरिक्ष, मन आणि प्राण हे अक्षर पुरुषांमध्ये केंद्रीत झाले आहेत. त्या एका ब्रह्माला तू जाण आणि इतर बोलण्याकडे दुर्लक्ष कर. हें ज्ञान हाच मोक्षप्राप्तीचा सेतु आहे.

**अरा इव रथनाभौ संहता यत्र नाड्यः स एषोऽन्तश्चरते बहुधा जायमानः। ओमित्येवं ध्यायथ आत्मानं स्वस्ति वः पाराय तमसः परस्तात् ॥ 2.2.6।।**

रथनाभौ अराः इव यत्र नाड्यः संहता बहुधा जायमानः सः एषः आत्मा अन्तः चरते आत्मानं ॐ इति एवं ध्यायथ वः तमसः परस्तात् पाराय स्वस्ति॥

रथनाभौ रथचक्राच्या नाभीत रथनाभि स्त्री. स. ए. व.

अराः इव आऱ्यांप्रमाणे

अरा स्त्री. प्र. ब. व.

यत्र जेथे अव्यय

नाड्यः नाड्या नाडी स्त्री. प्र. ब. व.

संहताः संलग्न सं+हन् धातु +क्तः प्रत्यय पु. प्र. ब. व.

बहुधा विविध

जायमानः होऊन जन् धातु + शानच् प्रत्यय दिवादिः पु. प्र. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

अन्तः चरते हृदयात वास करतो

अन्त पु. प्र. ए. व.

चरते

आत्मानम् आत्म्याचे आत्मन् पु. द्वि. ए. व.

ॐ इति एवं  ॐ असे

इति असे अव्यय

एवं एव नपु. प्र. ए. व.

ध्यायथ ध्यान कर

ध्यै धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद म. पु. ब. व.

वः युष्मद् च. ब. व.

तमसः अंधाराच्या तमस पु. प्र. ए. व.

परस्तात् पलीकडे अव्यय

पाराय पैलतीर पार पु. च. ए. व.

स्वस्ति ईश्वर कृपा होवो सु+ अस् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

प्राचीन ग्रंथांनुसार आपल्या शरीरात 72000 नाडी आहेत ज्या आपल्या शरीरात प्राणशक्ती वाहून नेण्याचे काम करतात. इड़ा, पिंगला आणि सुषुम्ना ह्या प्रमुख नाड्यांची नावे आपल्याला माहीत असतात. एखाद्या व्यक्तीची ओळख त्याच्या आत्म्यामुळे होत नसून त्याच्या मन आणि स्वभावामुळे होते. आपल्या मनाचा आणि हृदयाचा घनिष्ठ संबंध आहे. मन दुःखी किंवा आनंदी होऊ शकते. मात्र आत्म्याचे तसे नाही. मांडूक्य उपनिषदात, चेतना शक्ती वर गहन चिंतन केले आहे, ज्यामध्ये मानवाच्या मनाच्या चार अवस्थांचे वर्णन केले आहे, जाग्रत (जागृत), स्वप्न (स्वप्न), गाढ झोप (सुषुप्ति), आणि पारलौकिक अवस्था (तुरीय). श्रीअरबिंदो यांनी मन आणि चेतनाशक्ती च्या उत्कर्षाचे निरनिराळे टप्पे सांगितले आहेत, जसे सामान्य मन, भौतिक मन, उच्च मन, प्रदीप्त मन, अंतर्ज्ञानात्मक मन, अधिमानस, अतिमानस. ह्या मंत्रात रथचक्राची नाभी म्हणजे आपले अंतःकरण असे म्हटले आहे. येथे शरीरातील सर्व अवयवांना संलग्न अशा नाड्या येऊन मिळतात. शरीरशास्त्राच्या दृष्टीकोनातून हृदयापासून सर्व शरीराला रक्तपुरवठा केला जातो. आपले अंतःकरण हे चेतनाशक्तीचे अधिष्ठान आहे.

ह्या मंत्रात असे म्हटले आहे की

ज्याप्रमाणे रथनाभीपाशी आरी एकत्रित होतात त्याप्रमाणें (आपल्या शरीरातील) विविध नाड्या जेथे मिळतात तेथे तो संचार करतो, त्या आत्म्याचे ॐकाररूपात चिंतन कर. अज्ञान रूपी अंधाराच्या पलिकडच्या किनाऱ्यावर पोहोचण्यासाठी ईश्वरकृपा होवो.

**यः सर्वज्ञः सर्वविद् यस्यैष महिमा भुवि।दिव्ये ब्रह्मपुरे ह्येष व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः ॥मनोमयः प्राणशरीरनेता प्रतिष्ठितोऽन्ने हृदयं सन्निधाय। तद् विज्ञानेन परिपश्यन्ति धीरा आनन्दरूपममृतं यद् विभाति ॥2.2.7।।**

यः सर्वज्ञः सर्वविद् भुवि यस्य एषः महिमा एषः आत्मा दिव्ये ब्रह्मपुरे व्योम्नि प्रतिष्ठितः हि। मनोमयः प्राणशरीरनेता हृदयम् सन्निधाय अन्ने प्रतिष्ठितः धीराः यत् आनन्दरूपम् अमृतं विभाति विज्ञानेन तत् परिपश्यन्ति ॥

यः जो यद् पु. प्र. ए. व.

सर्वज्ञः सर्वज्ञ पु. प्र. ए. व.

सर्वविद् सर्व जाणणारा सर्वविद् पु. प्र. ए. व.

भुवि जगात भुविस् नपु. प्र. ए. व.

यस्य ज्याचा यद् पु. ष. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

महिमा महिमन् पु. प्र. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

दिव्ये दिव्य पु. स. ए. व.

ब्रह्मपुरे ब्रह्मपुर पु. स. ए. व.

व्योम्नि आकाशात व्योमन् पु. स. ए. व.

प्रतिष्ठितः प्रतिष्ठित पु. प्र. ए. व.

हि खरोखर अव्यय

मनोमयः मनाला व्यापलेला मनोमय पु. प्र. ए. व.

प्राणशरीरनेता प्राण आणि शरीराचा नियंत्रक प्राणशरीरनेतृ पु. प्र. ए. व.

हृदयम् हृदय नपु. प्र. ए. व.

सन्निधाय स्थापित करून अव्यय स्थापित करून सम्+नि+धा धातु धारण करणे +ल्यप् प्रत्यय

अन्ने अन्नामधे अन्न नपु. स. ए. व.

प्रतिष्ठितः स्थित प्रतिष्ठित पु. प्र. ए. व.

धीराः विवेकी धीर पु. प्र. ब. व.

यद् जे यद् नपु. प्र. ए. व.

आनन्दरूपम् आनन्दरूप नपु. प्र. ए. व.

अमृतम् अमृतम् नपु. प्र. ए. व.

विभाति प्रकाशित होतात वि+भा धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

विज्ञानेन  विज्ञान नपु. तृ. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

परिपश्यन्ति सर्वत्र पाहतात परि+दृश् धातु कर्तरि प्रयोग लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

आधीच्या मंत्रात आपण अंतःकरण, मन आणि आत्मा ह्यांचा सर्वसाधारण अर्थ समजावून घेतला. शरीरशास्त्राच्या दृष्टीने हृदयापासून सर्व शरीराला रक्ताद्वारे पोषण मिळते. म्हणजे शरीराला अन्न पुरवठा हृदयामार्फत होतो. ह्यालाच कदाचित अन्नमयकोष म्हणत असावेत. यथा अन्नं तथा मनः ह्या उक्ती प्रमाणे मनाची शुद्धता ही अन्नाच्या शुद्धतेवर अवलंबून आहे. हे श्रीमद्भगवद्गीतेतसुद्धा सांगितले आहे. तीन प्रकारच्या अन्नाचे वर्णन करून त्याचा त्रिगुणांशी संबंध जोडला आहे. आता ह्या मंत्रात ब्रह्मपुर असा शब्द वापरला आहे म्हणजे ब्रह्माचे निवासस्थान. सर्व जाणणारा आणि सर्वांचा ज्ञाता असा परमात्मा ब्रह्मपुरात आहे. आणि तो आपल्या अंतःकरणात सुद्धा आहे. जेथे आपल्या शरीरातील सर्व नाड्या केंद्रीत झाल्या आहेत. असे त्याचे अस्तित्व सगळीकडे व्यापून राहिले आहे. (उपनिषदांत कधीच त्याच्या पाताळ लोकातील अस्तित्वाचा उल्लेख नसतो)

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

तो सर्वज्ञ आहे, तो सर्वविद् आहे, त्याची ह्या जगात महानता आहे, तो आत्मा ब्रह्माच्या तेजोमय नगरीत स्थित आहे. तो मनावर राज्य करणारा, शरीर व इन्द्रियांना मार्ग दर्शन करणारा, हृदयात अन्नमय कोषात विराजमान आहे. आनंदमय आणि अमृतरूपाने प्रकाशित असे आत्मतत्त्व ज्ञानी आणि बुद्धिमान व्यक्ति त्या याला सगळीकडे पाहतात.

**भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः। क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥2.2.8।।**

तस्मिन् परावरे दृष्टे अस्य हृदयग्रन्थिः भिद्यते सर्वसंशयाः छिद्यन्ते कर्माणि क्षीयन्ते च ॥

तस्मिन् त्यामध्ये

परावरे व्यक्त अव्यक्त पर-अवर पु. प्र. ब. व.

न व्रियते वृ धातु आच्छादित करणे

दृष्टे पाहिल्यावर दृष्ट नपु. स. ए. व.

अस्य त्याची इदम् पु. ष. ए. व.

हृदयग्रन्थिः हृदयग्रन्थि पु. प्र. ए. व.

भिद्यते तुटतात भिद् धातु तोडणे कर्मणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

सर्वसंशयाः सर्वसंशय पु. प्र. ब. व.

छिद्यन्ते नष्ट होतात छिद् धातु कर्मणि प्रयोग लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

कर्माणि कर्मे कर्मन् नपु. प्र. ब. व.

क्षीयन्ते क्षय होतो क्षि धातु कर्मणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

च सुद्धा अव्यय

आधीच्या मंत्रात ज्ञानी लोक परमात्म्याला पाहतात असे म्हटले होते, ते कसे पाहतात त्याची प्रक्रिया ह्या मंत्रात सांगितली आहे. ज्ञानप्राप्ती चे फळ म्हणजेच व्यक्त आणि अव्यक्त ह्याची जाणीव, सत् आणि असत् ह्यामधील फरक, मिथ्या आणि सत्य याची ओळख असेही म्हणता येईल.

अंतःकरणाचा संबंध आपल्या भावभावना आणि इच्छाआकांक्षा यांच्याशी असतो. 2.1.10 ह्या मंत्रात आपण अविज्ञाग्रंथी ह्या शब्दाचा अर्थ समजून घेतला ह्या मंत्रात हृदयग्रन्थी असा शब्द वापरला आहे.

अविज्ञा म्हणजेच राग, द्वेष, तिरस्कार, आसूया, कामवासना, इच्छाआकांक्षा. आता ज्ञानप्राप्ती झाली आहे त्यामुळे सर्व काही सूर्यप्रकाशासारखे स्वच्छ दिसू लागले आहे. त्यामुळे कोणताच संशय मनात नाही. श्रीमद्भगवद्गीतेच्या  कर्म संन्यास योग असे नाव असलेल्या 5व्या अध्यायातील 3 ऱ्या श्लोकात कर्मसंन्यासी चा अर्थ सांगितला आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

अव्यक्त आणि व्यक्त ह्या दोन्ही छटांमधे त्याला पाहिले जाते तेव्हा साधकाच्या हृदयग्रन्थी तुटुन पडतात, त्याचे सर्व संशय नष्ट होतात आणि त्याच्या सर्व कर्मांचा क्षय होतो.

**हिरण्मये परे कोशे विरजं ब्रह्म निष्कलम्। तच्छुभ्रं ज्योतिषां ज्योतिस्तद्यदात्मविदो विदुः।।2.2.9 ॥**

हिरण्मये परे कोशे विरजम् निष्कलम् ब्रह्म तत् शुभ्रम् तत् ज्योतिषाम् ज्योतिः आत्मविदः यद् विदुः ॥

हिरण्मये परे कोशे सोनेरी श्रेष्ठ कोश

हिरण्मय पु. स. ए. व.

परे पर नपु. स. ए. व.

कोशे कोश पु. स. ए. व.

विरजम् डागरहीत विरज पु. द्वि. ए. व.

वि+रञ्ज् धातु रंगणे+णिच्+ अच्

निष्कलम् कलारहीत निराकार निष्कल पु. द्वि. ए. व.

निस्+कल् धातु गणना करणे+अच्

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

शुभ्रम् शुद्ध शुभ्र नपु. प्र. ए. व.

तत् तद् नपु. प्र. ए. व.

ज्योतिषाम् ज्योतींच्या ज्योतिस् नपु. ष. ब. व.

ज्योतिः ज्योतिस् नपु. प्र. ए. व.

आत्मविदः आत्मज्ञानी आत्मविद् पु. प्र. ब. व.

यद् जे यद् नपु. प्र. ए. व.

विदुः जाणतात विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

ह्या मंत्रात हिरण्मय कोश असा उल्लेख केला आहे. आपल्याला अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय अशी पाच आवरणे आणि त्यामध्ये असलेली चेतनाशक्ती ह्या बद्दल माहीती आहे. आपले मन हेच आपल्या निरनिराळ्या भावनांचे उगमस्थान मात्र अध्यात्मिक उन्नतीमुळे आपल्याला आपल्या आनंदमय कोषाची जाणिव होते आहे. खऱ्या अर्थाने उपनिषदातील महावाक्यांची अनुभूती होत आहे. मी शरीर नाहीये तर चैतन्यशक्ती आहे.

त्या चैतन्यशक्ती चे वर्णन ह्या मंत्रात असे केले आहे.

निर्दोष, निराकार, विशुद्ध, ज्योतींची ज्योत असे परब्रह्म सोनेरी कोशात विद्यमान आहे ते आत्मज्ञानी पुरुष जाणतात.

**न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः। तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥2.2.10 ॥**

तत्र सूर्यः न भाति चन्द्रतारकम्  न इमाः विद्युतः न भान्ति अयम् अग्निः कुतः तम् भान्तम् एव सर्वम् अनुभाति। तस्य भासा इदं सर्वम् विभाति ॥

तत्र तेथे अव्यय

सूर्यः सूर्य पु. प्र. ए. व.

न .अव्यय

भाति प्रकाशतो भा धातु प्रकाशणे कर्तरि लट् लकार परस्मैपद अदादिः प्र. पु. ए. व.

चन्द्रतारकम्  चंद्र आणि तारे चन्द्रतारकं नपु. प्र. ए. व.

न अव्यय

इमाः या इदम् स्त्री. प्र. ब. व.

विद्युतः वीजा विद्युत स्त्री. प्र. ब. व.

न अव्यय

भान्ति प्रकाशात भा धातु प्रकाशणे कर्तरि लट् लकार परस्मैपद अदादिः प्र. पु. ब. व.

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

अग्निः अग्नि पु. प्र. ए. व.

कुतः कोठून अव्यय

तम् एव तोच एक

तद् पु. द्वि. ए. व.

भान्तम् प्रकाशतो भान्ति नपु. प्र. ए. व.

सर्वम् सर्व नपु. प्र. ए. व.

अनुभाति त्याच्या नंतर प्रकाशतोअनु+ भा धातु प्रकाशणे कर्तरि लट् लकार परस्मैपद अदादिः प्र. पु. ए. व.

तस्य त्याच्या तद् पु. ष. ए. व.

भासा प्रकाशाने भास् नपु. तृ. ए. व.

इदं हे इदम् नपु. प्र. ए. व.

सर्वम् सर्व नपु. प्र. ए. व.

विभाति वि+भा धातु प्रकाशणे कर्तरि लट् लकार परस्मैपद अदादिः प्र. पु. ए. व.

सूर्यासमोर काजवा म्हणजे अगदीच नगण्य. आता ह्या मंत्राच्या अर्थाप्रमाणे सूर्यालाच काजवा म्हणण्याची वेळ आली आहे.  हाच मंत्र कठोपनिषद् (5.15) मध्ये सुद्धा आहे. भारतीय तत्वज्ञानात ज्ञान, तेज आणि प्रकाश हे शब्द सारख्याच अर्थाने वापरले जातात. प्रकाशात सर्व काही स्वच्छ दिसते म्हणून या मंत्रात सूर्य, चन्द्र, तारका, विद्युत आणि अग्नी यांचा उल्लेख केला आहे. मात्र ह्या सर्वांच्या चमकण्यामागे कोणी कर्ताकरविता आहे.

अनुकृतेस्तस्य च।।ब्रह्मसूत्र 1.3.22।।

कार्य करण्यामागे तोच आहे.

(जे प्रकाशित आहे त्याच्या मागे तो आहे)

आपण सूर्याला स्वयंप्रकाशित मानतो पण त्याला प्रकाश कोणी दिला? सूर्याला आपण रोज बघतो पण त्याला प्रकाशित करणाऱ्याला पाहण्यासाठी अंतर्दृष्टि हवी जी भक्ती आणि ध्यानधारणा करून गहन ज्ञान प्राप्त करून मिळेल. श्रीमद्भगवद्गीतेत म्हटल्याप्रमाणे आपल्या डोळ्यासमोर माया शक्तीचे आवरण आहे ते दूर झाल्याशिवाय परमात्म्याला पाहता येत नाही. सूर्य चन्द्र तारका वीज आणि अग्नी ह्यांना प्रकाश देणारा, प्रकाशच आहे जो साध्या डोळ्यांनी आपण पाहू शकत नाही. प्रखर ज्ञानामुळे सत्य स्पष्टपणे दिसून येईल. ह्या अध्यात्मिक जागृतीने आपले अज्ञान दूर होईल.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

तेथे सूर्य प्रकाशत नाही, ना चंद्रतारका ना वीज मग अग्नी तरी कसा प्रकाशित होईल? तोच एक प्रकाशतो. आणि त्यानंतर त्याच्या प्रकाशाने सर्व प्रकाशमान होतात.

**ब्रह्मैवेदममृतं पुरस्तात् ब्रह्म पश्चाद् ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण।**

**अधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ॥2.2.11।।**

इदम् अमृतं ब्रह्म एव ब्रह्म पुरस्तात् ब्रह्म पश्चात्  दक्षिणतः उत्तरेण  अधः ऊर्ध्वं च प्रसृतम् ब्रह्म एव इदम्  विश्वम् इदम् वरिष्ठम्  ॥

इदम् हे इदम् नपु. प्र. ए. व.

अमृतं अविनाशी अमृत नपु. प्र. ए. व.

ब्रह्म एव ब्रह्मच ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

पुरस्तात् पुढे अव्यय प्राच्यां दिशि

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

पश्चात् पाठीमागे अव्यय

दक्षिणतः उजवीकडून दक्षिण+तसिल्

उत्तरेण डावीकडून उत्तर नपु. तृ. ए. व.

अधः खाली अव्यय नीचं

ऊर्ध्वं वर ऊर्ध्व नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

प्रसृतम् पसरलेले प्रसृत नपु. प्र. ए. व. प्र+सृ धातु जाणे +क्तः प्रत्यय

ब्रह्म एव ब्रह्मच ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

इदम्  हे नपु. प्र. ए. व.

विश्वम् विश्व नपु. प्र. ए. व.

इदम् हे नपु. प्र. ए. व.

वरिष्ठम् श्रेष्ठ वरिष्ठ पु. द्वि. ए. व.

कठोर तपस्या आणि उपासनेचे फलित हेच की भक्ताला तो सर्व ठिकाणी दिसतो. जे सत्य आहे ते एकसंध आहे. आपण जे पाहतो ते तुकड्या तुकड्यात पाहतो म्हणून ते वेगवेगळे आहे असे वाटते. ह्या साठी माती आणि घडा याची उपमा दिली जाते किंवा सोने आणि सोन्याचे दागिने. दागिने घडण्यापूर्वी ते फक्त सोने असते आणि दागिने मोडल्यावर सुद्धा ते सोनेच असते.

दुसऱ्या मुण्डकातील दुसऱ्या अध्यायातील हा शेवटचा मंत्र अद्वैतवादाचा पुरस्कार करणारा. ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

हे अविनाशी ब्रह्मच आहे. ब्रह्म पुढे आहे, ब्रह्म मागे आहे, ते उजवीकडे आहे डावीकडे आहे, वर आणि खाली सगळीकडेच पसरलेले, संपूर्ण विश्व श्रेष्ठ ब्रह्मच आहे.

---

## मुण्डकोपनिषद् 3.1.1-10

**द्वौ सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते।**

**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥3.1.1।।**

सयुजा सखाया द्वा सुपर्णा समानम् वृक्षम् परिषस्वजाते। तयोः अन्यः पिप्पलम् स्वादु अत्ति। अन्यः अनश्नन् अभिचाकशीति ॥

सयुजा सयुजौ साथी सा युज पु. प्र. द्वि. व.

सखाया सखायौ सखि पु. प्र. द्वि. व. सखा समानः ख्यायते ख्या धातु व्याख्यान करणे

द्वा द्वौ दोन

सुपर्णा पक्षी सु+पृण् धातु आनंदी होणे+णिच्+अच् पृणँ प्रीणने  तुदादिः

समानम् समान नपु. प्र. ए. व.

वृक्षम् वृक्ष नपु. प्र. ए. व.

परिषस्वजाते आलिंगनबद्ध आहेत परि+स्वञ्ज् धातु आलिंगन देणे कर्माणि लिट्लकारः भवादिः आत्मनेपदी प्र. पु. द्वि. व.

तयोः त्यांच्या पैकी तद् पु. ष. द्वि. व.

अन्यः अन्य पु. प्र.. व.

पिप्पलम् झाडाचे फळ पिप्पल नपु. प्र. ए. व.

स्वादु चवीने  स्वादु नपु. प्र. ए. व.

अत्ति खातो अद् धातु खाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

अन्यः अन्य पु. प्र. ए. व.

अनश्नन् न खाता अन्-अश्नन्

अश्नन् -अश्+शतृ अश्नत् पु. प्र. ए. व.

अशनम् अश् धातु ल्युट् प्रत्यय

अभिचाकशीति नुसतेच पाहतो अभि+कश् धातु जाणे + यङ्लुक् कृदन्त  अदादिः कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

हा मंत्र ऋग्वेदात 1.164.20 वाचायला मिळतो. तसेच श्वेताश्वतरोपनिषदातील 4थ्या अध्यायातील 6वा मंत्र.

आधीच्या म्हणजे दुसऱ्या मुण्डकात उपनिषदातील महावाक्यांच्या अनुभवांचे वर्णन केले होते.

युज् धातु म्हणजे जोडणे ह्या पासून तयार झालेला शब्द सयुजा. चतुर्विध मुक्तींतील चौथी पायरी म्हणजे सायुज्यता. जेव्हा साधकाची वाणी परमेश्वराच्या विचारांशी मिळतीजुळती असते तेव्हा समान आख्यान करणारा असा तो सखा.

ह्या मंत्रात दोन पक्षी जे सखा आणि सायुज आहेत, यांचे वर्णन केले आहे. त्यापैकी एक ईश्वर आणि दुसरा जीव आहे. ते एका वृक्षावर बसले आहेत. वृक्ष परीवर्तनीय आहे. हे सर्व पुरुष आणि प्रकृती चे प्रतिनिधीत्व करत आहेत. त्याही पुढे जाऊन वृक्षावर असणारी फळे काही कच्ची, आंबट तर काही सुमधूर हे सर्व कर्मफळांचे प्रातिनिधिक आहे असे म्हणता येईल. जीवात्मा अर्थातच मायाशक्ती च्या प्रभावाखाली आहे, म्हणून तो निरनिराळी फळे चाखतो आहे. परमात्म्याचे असे काही नाही. म्हणून तो जीवात्म्याकडे नुसते पहात आहे. परमात्मा जीवात्मा आणि प्रकृती अशा अनादी तत्त्वांचा पुरस्कार करणाऱ्या त्रैतवादाचे वर्णन करणारा हा मंत्र.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

दृढ अशी मैत्री असणारे दोन पक्षी एकाच वृक्षावर बसले आहेत त्यापैकी एक त्या वृक्षाची फळे चवीने खात आहे तर दुसरा (ती फळे) न खाता फक्त पहात आहे.

---

**समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनिशया शोचति मुह्यमानः। जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानमिति वीतशोकः ॥3.1.2॥**

समाने वृक्षे निमग्नः पुरुषः मुह्यमानः अनीशया शोचति। यदा अन्यम् जुष्टम् ईशम् अस्य इति महिमानम् पश्यति वीतशोकः

समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनिशया शोचति मुह्यमानः। जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानमिति वीतशोकः ॥3.1.2॥

समाने वृक्षे निमग्नः पुरुषः मुह्यमानः अनीशया शोचति। यदा अन्यम् जुष्टम् ईशम् अस्य इति महिमानम् पश्यति वीतशोकः

समाने समान नपु. स. ए. व.

वृक्षे वृक्ष पु. स. ए. व.

निमग्नः निमग्न पु. प्र. ए. व.

पुरुषः पुरुष पु. प्र. ए. व.

मुह्यमानः मोहित होऊन

अनीशया सामर्थ्यहीन अनीशा स्त्री. तृ. ए. व.

शोचति शोक करतो शुच् धातु कर्तरि लट्लकार परस्मैपद भ्वादिः प्र.ए. व.

यदा जेव्हा अव्यय

अन्यम् दुसरा अन्य पु. द्वि. ए. व.

जुष्टम् पूजनीय जुष् धातु संतुष्ट करणे क्त प्रत्यय तुदादिः नपु. प्र. ए. व.

ईशम् ईश पु. द्वि. ए. व.

अस्य त्याचा इदम् पु. ष. ए. व.

इति असे अव्यय

महिमानम् महिमा महिमन् पु. द्वि. ए. व.

पश्यति पाहतो दृश् धातु पाहणे कर्तरि लट्लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

वीतशोकः शोकमुक्त वीतशोक पु. प्र. ए. व.

वी धातु फेकणे क्त प्रत्यय

आधीच्या मंत्रात उल्लेख केलेल्या दोन पक्षांचे नेमके स्वरूप ह्या मंत्रात स्पष्ट केले आहे. एकाच वृक्षावर बसलेले दोन पक्षी. येथे वृक्षावर असणारी फळे म्हणजे आपल्याला आयुष्यात येणारे निरनिराळे अनुभव. येथे वाईट अनुभवांचा उल्लेख केला आहे. जेव्हा कटू प्रसंगांनी मन विटून जाते तेव्हा आपण आत्मपरीक्षण करण्यास सुरुवात करतो तेव्हा आपल्याच लक्षात येते की शांती मिळवण्याचा मार्ग आपल्या मधेच आहे कारण आपला आत्मा हा परमात्म्याचाच अंश आहे हे जेव्हा पटते तेव्हा आपल्या मनावरचा ताण कमी होतो. ह्या मंत्रात उल्लेख केलेल्या दुसऱ्या पक्षाची ओळख आपल्याला आपल्यामध्येच होते. हा मंत्र आपल्याला एक महत्त्वाचा संदेश देत आहे. आपल्या वाट्याला आलेले भोग हे अज्ञानाचा, आपल्या मोहमायेचे तात्पुरता खेळ आहे.

ऋतं पिबन्तौ सुकृतस्य लोके गुहां प्रविष्टौ परमे परार्धे ।

॥ कठोपनिषद् 1.3.1 ॥

जे लोक आपल्या पुण्य कर्माची फळे भोगतात ते शरीराच्या गुहेत ब्रह्मस्थित असतात.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

एकाच वृक्षावर बसलेल्यापैकी एक पुरुष मोहित झालेला (अज्ञानान) मग्न असहायपणे शोक करतो पण जेव्हा तो दुसऱ्या पूजनीय अशा ईश्वरास पाहतो तेव्हा त्याचा महिमा जाणून तो शोकमुक्त होतो.

---

**यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम्। तदा विद्वान् पुण्यपापे विधूय निरञ्जनः परमं साम्यमुपैति ॥3.1.3।।**

यदा पश्यः रुक्मवर्णं ब्रह्मयोनिम् कर्तारम् ईशम् पुरुषम् पश्यते तदा पुण्यपापे विधूय विद्वान् निरञ्जनः परमम् साम्यम् उपैति ॥

यदा जेव्हा अव्यय

पश्यः पाहणारा

रुक्मवर्णं सोनेरी वर्णाचा रुक्मवर्ण पु. द्वि. ए. व.

रुच् धातु प्रकाशित होणे+उणादिप्रत्यय +मन्

ब्रह्मयोनिम् ब्रह्माचे उत्पत्ती स्थान ब्रह्मयोनि स्त्री. द्वि. ए. व.

कर्तारम् कर्ता कर्तृ पु. द्वि. ए. व.

ईशम् ईश पु. द्वि. ए. व.

पुरुषम् पुरुष पु. द्वि. ए. व.

पश्यते पाहतो पश्यत् दृश् धातू पाहणे शतृ प्रत्यय पु. च. ए. व.

तदा तेव्हा अव्यय

पुण्यपापे पुण्यपाप नपु. द्वि . द्वि . व.

विधूय झटकून वि+धू धातु कंपित करणे+ल्यप् प्रत्यय अव्यय

विद्वान् विद्वस् पु. प्र. ए. व.

निरञ्जनः निर्मळ निरञ्जन पु. प्र. ए. व.

अञ्जनशून्ये अन्ज धातु डागाळणे ल्युट् प्रत्यय

परमम् श्रेष्ठ परम नपु. प्र. ए. व.

साम्यम् साम्यावस्थेत साम्य नपु. प्र. ए. व.

उपैति प्राप्त करतो उप+इ धातु जाणे कर्तरि लट्लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

तिसऱ्या मुण्डकापासून माया शक्ती चे आवरण नष्ट करून म्हणजेच अज्ञानाचे आवरण नष्ट होऊन दिव्य शक्तीचा साक्षात्कार होण्यापर्यंत चा प्रवास आपण पाहिला. आता ह्या मंत्रात प्रत्यक्ष परमात्म्याशी एकरूप होण्याची प्रक्रिया होत आहे. आत्मज्ञान आणि प्रकाश हे शब्द सारख्याच अर्थाने वापरले आहेत. ह्या मंत्रात तर प्रकाशाला सोनेरी रंगाचा म्हटले आहे. अद्वैतवादाचा पुरस्कार करताना हा तेजस्वी प्रकाश कोणी दाखवत नसून तो स्वतःच पाहिला जात आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

जेव्हा सोनेरी वर्णाचा जगाचा कर्ता, तसेच ब्रह्माच्या उत्पत्ती चे कारण असणाऱ्या पुरुषाला पाहतो तेव्हा तो ज्ञानी सर्व पापपुण्ये झटकून टाकून निर्मळ अकिल्मिष असा होतो आणि परब्रह्माबरोबर साम्यावस्थेत श्रेष्ठत्वास प्राप्त होतो.

---

**प्राणो ह्येष यः सर्वभूतैर्विभाति विजानन् विद्वान् भवते नातिवादी।**

**आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः ॥3.1.4।।**

यः हि प्राणः एषः सर्वभूतैः विभाति विजानन् विद्वान् अतिवादी न भवते । आत्मक्रीडः आत्मरतिः क्रियावान् एषः ब्रह्मविदाम् वरिष्ठः

यः जो यद् पु. प्र. ए. व.

हि सुद्धा अव्यय

प्राणः प्राण पु. प्र. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

सर्वभूतैः सर्व सजीवांमधे सर्वभूत नपु. तृ. ब. व.

विभाति प्रकाशतो वि+भा धातु प्रकाशणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

विजानन् विशेष जाणून विजानात् पु. प्र. ए. व.

वि+ज्ञा धातु शतृ प्रत्यय

विद्वान् ज्ञानी विद्वस् पु. प्र. ए. व.

अतिवादी वाचाळ अति+वादिन् पु. प्र. ए. व.

न अव्यय

भवते होतो भू धातु चुरादिः  कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

आत्मक्रीडः आत्मक्रीडा करणारा आत्मक्रीड

आत्म+क्रीड् धातू विहार करणे + णिच् + अच् प्रत्यय  भ्वादिः पु. प्र. ए. व.

आत्मरतिः आत्म्यात रमणारा आत्मरति पु. प्र. ए. व.

क्रियावान् कर्म करणारा क्रियावत् पु. प्र. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

ब्रह्मविदाम् ब्रह्मवेत्ता ब्रह्मविद्

वरिष्ठः श्रेष्ठ वरिष्ठ पु. प्र. ए. व.

माणूस जसा जसा ज्ञान प्राप्त करत जातो तसतसा तो आत्मपरीक्षण करायला लागतो, बोलणे कमी आणि विचार जास्त असे करताकरता आपोआपच तो चांगला श्रोता बनतो. प्रत्येक शब्द तो विचार

करून उच्चारतो. यज्ञ, दान, तपश्चर्या, उपासना, व्रत, उपवास, जप, ध्यान ह्या सर्वांमध्ये ज्ञानासारखे शुद्धीकरणाचे साधन नाही.

ह्या सर्वांमागे त्याची प्रेरणा कोणती असते.

प्राणस्य प्राणः।। केनोपनिषद् 1.2।।

आपले मन, बोलणे, ऐकणे ह्या सर्वांच्या मागे सुद्धा परमात्माच आहे.

नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते'। श्रीमद्भगवद्गीता 4.38 ज्ञानासारखे पवित्र काहीच नाही.

ज्ञानाविषयीची आस्था हेच तर विद्वान असण्याचे लक्षण. ज्ञान मिळवण्यासाठी बाहेरील संसाधने आवश्यक, त्यासाठी आत्मक्रीडा हा शब्द वापरला असावा. ज्याला चैतन्यशक्ती चा साक्षात्कार झाला आहे तो स्वतःमध्येच रममाण असतो म्हणजे आत्मरत असतो.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

सर्व सजीवांना प्रकाशित करणारा तो प्राण (ईश्वर) च आहे हे विशेषत्वाने जाणल्यावर विद्वान व्यर्थ बोलत नाही. तो शास्त्रविहित कर्मे करणारा, आत्मरत आणि आत्मक्रीडा करणारा असा सर्व ब्रह्मवेत्त्यांमधे सर्वश्रेष्ठ असतो.

---

**सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥3.1.5।।**

यम् क्षीणदोषाः यतयः पश्यन्ति एषः ज्योतिर्मयः शुभ्रः आत्मा अन्तःशरीरे हि नित्यम् सत्येन तपसा सम्यक् ज्ञानेन ब्रह्मचर्येण च लभ्यः हि ॥

यम् ज्याला यद् पु. द्वि. ए. व.

क्षीणदोषाः दोष क्षीण झालेला क्षीणदोष पु. प्र. ब. व.

यतयः संन्यासी यति पु. प्र. ब. व.

पश्यन्ति पाहतात दृश् धातु कर्तरि लट्लकार परस्मैपद प्र पु. ब. व.

एषः हा एतद् सर्व. पु. प्र. ए. व.

ज्योतिर्मयः तेजस्वी ज्योतिर्मय पु. प्र. ए. व.

शुभ्रः शुद्ध शुभ्र पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

अन्तःशरीरे शरीरात अंतर्यामी अन्तःशरीर नपु. स. ए. व.

हि सुद्धा अव्यय

नित्यम् नित्य नपु. प्र. ए. व.

सत्येन सत्याने सत्य नपु. तृ. ए. व.

तपसा तपश्चर्येने तपस् नपु. तृ. ए. व.

सम्यक् ज्ञानेन यथार्थ ज्ञानाने सम्यक् ज्ञान नपु. तृ. ए. व.

ब्रह्मचर्येण ब्रह्मचर्येचे ब्रह्मचर्य नपु. तृ. ए. व.

च सुद्धा अव्यय

लभ्यः प्राप्त होतो लभ्यः लभ् धातु +यत् प्रत्यय पु. प्र. ए. व.

हि खरोखर अव्यय

परमात्म्याशी जोडून घेण्याची प्रक्रिया सोपी नाही त्यासाठी मनाचा निग्रह आणि बरेच नियम पाळावे लागतात. श्रीमद्भगवद्गीतेच्या 16 व्या अध्यायात आपण दैवी आणि आसुरी संपदा याबद्दल जाणून घेतले. अष्टांग योगातील आठ नियम आपल्याला माहीत आहेत. यतते इति यति म्हणजे प्रयत्नांची पराकाष्ठा करणारा. यति म्हणजे दृढनिश्चयी आणि त्याचा दुसरा अर्थ म्हणजे संन्यासी.

प्रमाण म्हणजे यथार्थ ज्ञान मिळवणे जे सत्य आणि असत्य च्या चाचणीतून पडताळून पाहिले आहे. अशी ज्ञानाची सत्यता पडताळून पाहण्याच्या तीन पद्धती प्रत्यक्ष अनुमान आणि आगम. ज्ञानामुळे सर्व गोष्टी स्पष्ट दिसतात. तपश्चर्येने मनावर संयम ठेवता येतो, स्वतःला शुद्ध करण्याची जणू गुरुकिल्लीच त्याचे तेज चेहऱ्यावर झळकते.

ह्या मंत्रात असे म्हटले आहे की

सत्य, तप, यथार्थ ज्ञान आणि ब्रह्मचर्य यांचे नियमित प्रयत्न पूर्वक आचरण केल्याने ज्याचे दोष नाश पावले आहेत अशा जोतिर्मय आणि शुद्ध संन्यासी ला, आपल्याच शरीरामध्ये आत्म्याचे (ईश्वराचे) दर्शन होते.

---

**सत्यमेव जयति नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः। येनाक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत् सत्यस्य परमं निधानम् ॥3.1.6।।**

सत्यम् एव जयति अनृतम् न सत्येन देवयानः पन्थाः विततः। येन आप्तकामाः ऋषयः आक्रमन्ति हि यत्र सत्यस्य तत् परमम् निधानम्॥

सत्यम् एव सत्यच

सत्य नपु. प्र. ए. व.

जयति जिंकते जि धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

न अव्यय

अनृतम् न ऋतं असत्य

न अनृतम् असत्याचा नाही

अनृतम् अनृत नपु प्र. ए. व.

सत्येन सत्याने सत्य नपु. तृ. ए. व.

देवयानः देवाकडे नेणारे वाहन देवयान पु. प्र. ए. व.

पन्थाः मार्ग पन्थ पु. प्र. ब. व.

विततः विस्तृत वि+तन् धातु+क्तः प्रत्यय पु. प्र. ए. व.

येन ज्याद्वारे यद् पु. तृ. ए. व.

आप्तकामाः तृष्णारहित (कामना तृप्त) आप्तकाम पु. प्र. ब. व.

ऋषयः ऋषी ऋषि पु. प्र. ब. व.

आक्रमन्ति पोहोचतात क्रम् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

हि खरोखर अव्यय

यत्र जेथे अव्यय

सत्यस्य सत्याचे सत्य नपु. ष. ए. व.

तत् त्या तद् नपु प्र. ए. व.

परमम् श्रेष्ठ परम नपु द्वि. ए. व.

निधानम् आश्रयस्थान निधान नि+धा + आधारे ल्युट् प्रत्यय नपु. द्वि. ए. व.

आधीच्या मंत्रात आत्मज्ञान प्राप्त होण्यासाठी करावे लागणारे प्रयास, ह्या संबंधी भाष्य केले होते. त्यापैकी एक म्हणजे 'सत्य', त्याचे विवेचन ह्या मंत्रात दिले आहे.

सत्याचाच विजय होतो असे सुरवातीला म्हटले असल्याने सहाजिकच सत्य म्हणजे काय असा प्रश्न मनात येतो.

जे डोळ्यांना प्रत्यक्ष दिसते तेच सत्य असे मानले तर कावीळ झालेल्या माणसाला सर्व काही पिवळे दिसते. काही गोष्टी आपल्याला अज्ञानापोटी माहीतच नसतात ह्याचे सर्वात मोठे उदाहरण म्हणजे आस्ट्रेलिया मध्ये 17 व्या शतकात आढळून आलेला काळा हंस. तोपर्यंत आपली हीच समजूत होती की हंस फक्त पांढराच असतो. म्हणजेच सत्य सापेक्ष आहे. ज्या गोष्टी नित्य असतात, अबाधित असतात त्यांना 'ऋत' म्हणतात. ह्या सृष्टीचे नियम, विश्वातील व्यवस्था, सूर्य आणि पृथ्वीचे नाते हे सर्व नित्य आहे. सत्य एकटे नसते. त्याच्या बरोबर इतरही काही गोष्टी सत्य म्हणून सुसंगत किंवा सुसंवादी असतात. जसे दोरी आणि सापातील फरक. दोरी सरपटत नाही, आपल्याला दंश करत नाही म्हणून ती सर्प नाही.

ॲरिस्टॉटलने अतिशय सोपी सुटसुटीत मांडणी केली आहे. ‘‘जे आहे त्याबद्दल, ते नाही असे म्हणणे आणि जे नाही त्याबद्दल, ते आहे असे म्हणणे असत्य होय; तर जे आहे त्याबद्दल, ते आहे असे म्हणणे आणि जे नाही त्याबद्दल, ते नाही असे म्हणणे सत्य होय’’.

'ऋतं वच्मि सत्यं वच्मि'  असे अथर्वशीर्षात मुद्दाम वेगळे सांगितले आहे.

सत्य जेव्हा नीतिमूल्य म्हणून येते, तेव्हा त्याचा अर्थ प्रामाणिकपणा. सत्य म्हणजे नैतिकता.

आत्मनः प्रतिकूलानि परेषां न समाचरेत् ।.जी गोष्ट लोकांनी आपल्याबरोबर केलेली आपल्याला आवडत नाही ती गोष्ट आपणही दुसऱ्या बरोबर करायची नाही.

म्हणूनच उपनिषदामधे

सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् , न ब्रूयात् सत्यम् अप्रियम् । प्रियं च नानृतम् ब्रूयात् , एष धर्मः सनातन: ॥ सत्य बोलावे, प्रिय बोलावे. अप्रिय सत्य बोलू नये, प्रिय असत्य बोलू नये हाच सनातन धर्म आहे, असे म्हटले आहे.

ऋतं सत्यं परं ब्रह्म।। श्री नारायण सूक्तम 13।।

शाश्वत सत्य आणि नैतिक सत्य हेच परब्रह्म आहे.

ऋत च्या विरूद्ध अर्थी शब्द अनृत.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

सत्यच बलवान असते, (म्हणून जिंकते) मिथ्या नाही. त्यामुळेच देवाकडे जाण्याचा मार्ग सापडत जातो. ज्यांच्या कामना पूर्ण झाल्या आहेत असे ऋषीगण याच सत्याच्या मार्गाने परमधामाकडे पोहोचतात.

---

**बृहच्च तद्दिव्यमचिन्त्यरूपं सूक्ष्माच्च तत्सूक्ष्मतरं विभाति। दूरात्सुदूरे तदिहान्तिके च पश्यत्स्विहैव निहितं गुहायाम् ॥3.1.7।।**

तत् बृहत् दिव्यम् अचिन्त्यरूपं च विभाति। तत् सूक्ष्मात् सूक्ष्मतरं तत् दूरात् सुदूरे तत् इह अन्तिके च इह एव पश्यत्सु गुहायाम् निहितं ॥

तत् ते तद् सर्वनाम नपु. प्र. ए. व.

बृहत् विशाल बृहत् नपु. प्र. ए. व.

बृह् धातु +शतृँ प्रत्यय

दिव्यम् दिव्य नपु. प्र. ए. व.

अचिन्त्यरूपम् कल्पनातीत अचिन्त्यरूप नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

विभाति प्रकाशित होते वि+भा धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद अदादिः प्र. पु. ए. व.

तत् ते तद् सर्वनाम नपु. प्र. ए. व.

सूक्ष्मात् सूक्ष्माहून सूक्ष्म नपु. पं. ए. व.

सूक्ष्मतरं सूक्ष्म तरप् प्रत्यय

तत् ते तद् सर्वनाम नपु. प्र. ए. व.

दूरात् दूराहून दूर नपु. पं. ए. व.

सुदूरे अतीदूर सुदूर नपु. स. ए. व.

तत् ते तद् सर्वनाम नपु. प्र. ए. व.

इह येथे अव्यय

अन्तिके जवळ अन्तिक नपु. स. ए. व.

च सुद्धा अव्यय

इह इथे अव्यय

एव अव्यय

पश्यत्सु पाहणाऱ्यामधे पश्यत् नपु. स. ब. व.

पश्यत् दृश् धातु +शतृँ प्रत्यय नपु. प्र. ए. व.

गुहायाम् गुहेमध्ये गुहा स्त्री. स. ए. व.

निहितं वसलेले निहित नि+धा धातु धारण करणे +क्त नपु. प्र. ए. व.

आधीच्या मंत्रात सत्य आणि ऋत ह्या शब्दांचे अर्थ आपण नीट समजून घ्यावेत असाच त्यामागचा हेतू असावा कारण ह्या मंत्रातील गर्भित अर्थ समजून घेण्यासाठी ते आवश्यक आहे असे वाटते.

आपल्या बुद्धीला चालना देणारा असा मंत्र. ह्या मधे परब्रह्माचे स्वरूप विषद करून सांगताना तो अचिन्त्यरूप म्हणजे अकल्पनीय आहे असे म्हटले आहे. तरीसुद्धा पंचमहाभूतांच्या उदाहरणानी आपल्याला त्याला समजून घेता येईल. जसे तो बृहत् असा आहे. आकाशतत्व असे विस्तीर्ण आहे जे आपल्या डोळ्यात मावू शकत नाही. त्याच वेळी ते अती सूक्ष्म सुद्धा आहे जसे वायू. अत्यंत सूक्ष्म जीवाला सुद्धा श्वास घ्यायचा असतो. आपले मन अतिशय गतीमान आहे. क्षणात ते सूर्यापर्यंत पोहोचेल. परब्रह्माचे अस्तित्व दूराहून दूर असे म्हटले आहे. आणि ते अगदी जवळ म्हणजे आपल्यातच आहे.  आपल्या मन आणि बुद्धीला प्रकाशित करणारे असे ते दिव्य तत्व आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ते ब्रह्म अतीविशाल, दिव्य, अकल्पनीय, सूक्ष्माहून सूक्ष्म, दूराहून दूर आणि (ज्ञानी साठी) इथेच अगदी जवळ आहे. ते पाहू शकणाऱ्यांना त्याचा साक्षात्कार त्यांच्या हृदयगुहेतच होत असतो.

---

**न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा।**

**ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ॥3.1.8॥**

चक्षुषा न गृह्यते। वाचा अपि न। अन्यैः देवैः न तपसा कर्मणा वा  ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्वः ततः तु ध्यायमानः निष्कलम् तम् पश्यते ॥

चक्षुषा डोळ्याने चक्षुस् नपु. तृ. ए. व.

न अव्यय

गृह्यते ग्रहण होते गृह् धातु भ्वादिः कर्मणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

वाचा वाणी वाच् स्त्री. तृ. ए. व.

अपि न सुद्धा नाही अव्यय

अन्यैः इतर अन नपु. तृ. ब. व.

देवैः इन्द्रियांनी देव नपु. तृ. ब. व.

न

तपसा तपाने तपस् नपु. तृ. ए. व.

कर्मणा कर्माने कर्मन् नपु. तृ. ए. व.

वा  किंवा अव्यय

ज्ञानप्रसादेन ज्ञानाच्या प्रसादाने ज्ञानप्रसाद पु. तृ. ए. व.

विशुद्धसत्वः शुद्ध अंतःकरण असलेला विशुद्धसत्व पु. प्र. ए. व.

ततः त्यानंतर तत पु. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

ध्यायमानः ध्यानसाधक ध्यायमान मान् + अच् प्रत्यय पु. प्र. ए. व.

निष्कलम् अवयव रहीत निष्कल निस् + कल् धातु +अच् प्रत्यय नपु. प्र. ए. व.

तम् त्याला तद् पु. द्वि. ए. व.

पश्यते पाहतै दृश् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

आधीच्या मंत्रात मती गुंग करून टाकणारे परब्रह्माचे वर्णन आपण वाचले.

अशाच प्रकारचा एक मंत्र छांदोग्य उपनिषदात सापडतो.

एष म आत्मान्तर्हृदयेऽनियांनवीहेर्वा यवद्वा सर्षपाद्वा श्यामाकाद्वा श्यामाकतण्डुलाद्वैष मा आत्मान्तर्हृदये ज्यायनपृथिव्या ज्यायनन्तरिक्षज्ज्यानन्दिवो ज्यानेभ्यो लोकेभ्यः ॥ छांदोग्य उपनिषद् 3.14.3 ॥

माझ्या हृदयातील माझा आत्मा तांदूळ दाण्यापेक्षा लहान, जव  सरसो आणि बाजरी च्या दाण्यापेक्षा सुद्धा लहान आहे. माझ्या हृदयात जो आत्मा आहे तो पृथ्वी, मध्यलोक, स्वर्ग आणि सर्व लोकांपेक्षा सुद्धा मोठा आहे.

हे वाचल्यावर अद्वैतवादाची अगदी खात्रीच पटते. 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हे महावाक्य सुद्धा छांदोग्य उपनिषदातलेच.

असे हे ब्रह्म आपल्या डोळ्यांना कसे बरे दिसेल? फक्त आत्म्यालाच त्याची ओळख पटू शकते. त्याचे वर्णन केवळ शब्दांनी करणे अशक्यच म्हणूनच कदाचित 'अहम् ब्रह्मास्मि' इतकेच म्हणत असावेत. दिव् धातु पासून तयार झालेला शब्द देव म्हणजे प्रकाश देणारे. डोळे आणि वाचा यांचा उल्लेख करून झाल्यावर अनैः देवैः म्हणजे इतर ज्ञानेंद्रियांनी सुद्धा ब्रह्माला अनुभवता येत नाही. मग ब्रह्मा पर्यंत पोहोचायचे कसे? ब्रह्म त्याच्याही पलिकडचे आहे. ते इतर इन्द्रियांनी ग्रहण करता येत नाही तसेच तप आणि कर्मकांडांनी सुद्धा ग्रहण करता येत नाही. केवळ आत्मज्ञान हाच मार्ग. आपल्या बुद्धीची ती क्षमता आहे. ज्ञानाच्या तेजाने आपली बुद्धी लखलखीत होते आहे. आता त्याच्या वर कामना इच्छा वासना ह्यांचा पुसटसा सुद्धा अंश शिल्लक नाही. असा ध्यानस्थ साधक स्वतः च ब्रह्माचे निराकार रूप पाहण्यास सक्षम आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

तो ना डोळ्यानी ना वाचेने ग्रहण करता येतो. इतर इन्द्रिये, कर्मकांड आणि तपाने सुद्धा नाही. केवळ ज्ञानाच्या महिम्याने अंतःकरण शुद्ध होऊन ध्यानधारणेच्या मार्गाने तो त्या निराकार ब्रह्माला पाहतो.

---

**एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यो यस्मिन् प्राणः पञ्चधा संविवेश।**

**प्राणैश्चित्तं सर्वमोतं प्रजानां यस्मिन् विशुद्धे विभवत्येष आत्मा ॥3.1.9।।**

एषः अणुः आत्मा चेतसा यस्मिन् वेदितव्यः यस्मिन् प्राणः पञ्चधा संविवेश। प्राणैः प्रजानाम् सर्वं चित्तम् ओतं यस्मिन् विशुद्धे एषः आत्मा विभवति

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

अणुः सूक्ष्म अणु पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

चेतसा बुद्धि ने चेतस् नपु. तृ. ए. व.

यस्मिन् ज्यामधे यद् नपु. स. ए. व.

वेदितव्यः जाणावे वेदितव्य पु. प्र. ए. व. विद् धातु तव्यत् प्रत्यय

प्राणः प्राण पु. प्र. ए. व.

पञ्चधा पाच प्रकारचे पञ्चन्+धा धातु धारण करणे

संविवेश प्रविष्ट आहेत सं+वि+विश् धातु कर्तरि प्रयोग लिट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

प्राणैः प्राणांसह प्राण पु. तृ. ब. व.

प्रजानाम् सजीवांचे प्रजा स्त्री. ष. ब. व.

सर्वम् सर्व नपु. प्र. ए. व.

चित्तम् अंतःकरण चित्त नपु. प्र. ए. व.

ओतं व्यापलेले ओत नपु. प्र. ए. व.

आङ्+उत

उत= वेञ् धातु विणणे +क्त प्रत्यय

यस्मिन् ज्यामधे यद् नपु. स. ए. व.

विशुद्धे शुद्ध होऊन विशुद्ध नपु. स. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

विभवति प्रकाशतो वि+भू धातु होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

परमेश्वराने आपल्याला जन्माला घालताना आपल्या देहात 'प्राणप्रतिष्ठा' करून आपल्याला जन्माला घातलेले असते. हा देह प्राणाशिवाय अचेतन आहे. देवळात मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली जाते. तरीसुद्धा

यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतम् । तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ केनोपनिषद् 1.5 ॥

ज्याची मनाने कल्पना करता येत नाही, पण ज्याच्यामुळे मन संवेदनाशील होते तेच केवळ ब्रह्म सत्य. ज्याची लोक पूजा करतात ते नव्हे. 7व्या मंत्रात ब्रह्माचे वर्णन अती विशाल आणि सूक्ष्म असे केले आहे. तर ह्या मंत्रात अणू असे म्हटले आहे. येथे अणूचा प्रचलित अर्थ न घेता अती सूक्ष्म आणि तरल असा घेता येईल. 8 व्या मंत्रात तो अचिन्त्यरूपं म्हणजे अकल्पनीय आहे असे म्हटले आहे. तसेच तो दुर्विज्ञेय म्हणजे समजायला अवघड असा आहे. म्हणजे नवीन साधकाला समजायला अवघड, पण ज्याला ज्ञान प्राप्ती झाली आहे तो चेतना शक्ती च्या माध्यमातून त्याला समजून घेऊ शकतो. ज्ञानाच्या तेजाने आपली बुद्धी उजळून निघते त्यालाच  विशुद्ध बुद्धी असे म्हटले आहे.

ह्या मंत्रात पंच प्राणांचा उल्लेख केला आहे. ते आपल्या शरीरातील महत्त्वाचे उर्जेचे स्त्रोत आहेत.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

पंचप्राणांनी व्यापलेल्या शरीरातील आत्म्याचे सूक्ष्म तरल रूप बुद्धीच्या साह्याने जाणून घ्यावे. जेव्हा अंतःकरण शुद्ध होते तेव्हा हा आत्मा प्रकाशतो. (स्पष्टता येते).

---

**यं यं लोकं मनसा संविभाति विशुद्धसत्त्वः कामयते यांश्च कामान्।तं तं लोकं जयते तांश्च कामां-तस्मादात्मज्ञं ह्यर्चयेत् भूतिकामः ॥3.1.10।।**

विशुद्धसत्त्वः यम् यम् लोकम् मनसा संविभाति याम् कामान् कामयते च तम् तम् लोकम् तान् कामान् च जयते तस्माद् भूतिकामः आत्मज्ञम् अर्चयेत् हि।

विशुद्धसत्त्वः शुद्ध अंतःकरण असलेला विशुद्धसत्त्व पु. प्र. ए. व.

यम् यम् जो जो यद् पु. द्वि. ए. व.

लोकम् लोक पु. द्वि. ए. व.

मनसा मनाने मनस् नपु. तृ. ए. व.

संविभाति इच्छा करतो सम्+वि+भा धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

याम् ज्या यद् स्त्री. द्वि. ए. व.

कामान् कामना काम पु. द्वि. ब. व.

कामयते इच्छा करतो कम् धातु इच्छा करणे कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

च सुद्धा अव्यय

तम् तम् तो तो तद् पु. द्वि. ए. व.

लोकम् लोक पु. द्वि. ए. व.

तान् त्या तद् पु. द्वि. ब. व.

कामान् कामना काम पु. द्वि. ब. व.

च सुद्धा अव्यय

जयते प्राप्त करतो जि धातु चुरादिः - कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

तस्माद् म्हणून तद् पु. पं. ए. व.

भूतिकामः ऐश्वर्याची इच्छा करणारा भूतिकाम पु. प्र. ए. व.

आत्मज्ञम् आत्मज्ञानी आत्मज्ञ पु. द्वि. ए. व.

अर्चयेत् पूजा करावी अर्च् धातु+णिच् प्रत्यय कर्तरि विधिलिङ् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

हि सुद्धा अव्यय

आतापर्यंत च्या मंत्रामधे आपण ध्यानधारणा, आत्मज्ञान आणि आत्मसाक्षात्कार ह्या बद्दल वाचले. एखाद्या गोष्टीचा सतत ध्यास घेतला असता आपल्या बुद्धीचे तेज वाढते आणि त्याबरोबरच सर्व वाईट गोष्टी गळून पडतात. आत्मसाक्षात्काराचा ध्यास घेतला तर आत्मसाक्षात्कार घडतो.

ह्या मंत्रात विशुद्ध प्रवृत्ती ची व्यक्ती ज्या ज्या गोष्टींची कामना करतो ते सर्व तो प्राप्त करतो. विशुद्ध आत्मा परब्रह्माशिवाय आणखी कसली कामना करणार?

'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति' असा उल्लेख पुढे येणार आहेच. (3.2.9)

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

शुद्ध बुद्धि चा माणूस ज्या ज्या लोकांची कल्पना करतो आणि ज्या काही कामना करतो ते ते सर्व त्याला प्राप्त होते. म्हणून ज्याला ऐश्वर्याची कामना असेल त्याने अशा आत्मज्ञानी ची पूजा करावी.

---

## मुण्डकोपनिषद् 3 रे मुण्डक 2रा खण्ड

**स वेदैतत्परमं ब्रह्म धाम यत्र विश्वं निहितं भाति शुभ्रम्। उपासते पुरुषं ये ह्यकामाः ते शुक्रमेतदतिवर्तन्ति धीराः ॥3.2.1।।**

सः एतत् परमम् ब्रह्म धाम वेद यत्र विश्वम् निहितम् शुभ्रम् भाति। ये अकामाः पुरुषम् उपासते ते धीराः एतद् शुक्रम् अतिवर्तन्ति हि ॥

सः तो तद् पु. प्र. ए. व.

एतत् हे एतद् पु. प्र. ए. व.

परमम् श्रेष्ठ परम नपु. प्र. ए. व.

ब्रह्मधाम ब्रह्म धाम ब्रह्मन् धामन् नपु. प्र. ए. व.

वेद जाणतो विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

यत्र जेथे अव्यय

विश्वम् विश्व विश्व नपु. प्र. ए. व.

निहितम् स्थित निहित नि+ हि धातु +क्तः प्रत्यय स्वादिः नपु. प्र. ए. व.

शुभ्रम् पवित्र शुभ्र नपु. प्र. ए. व.

भाति प्रकाशते भा धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

ये जे यद् पु. प्र. ब. व.

अकामाः कामना रहीत अ+काम पु. प्र. ब. व. पुरुषम् पुरुषास पुरुष पु. द्वि. ए. व.

उपासते उपासना करतो उप+अस् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

धीराः विवेकी पुरुष धीर पु. प्र. ब.व.

एतद् हे एतद् नपु. प्र. ए. व.

शुक्रम् पुनर्जन्म शुक्र नपु. प्र. ए. व.

अतिवर्तन्ति पार करतात वृत् धातु  चुरादिः कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

हि खरोखर अव्यय

ह्या मंत्राचा अर्थ समजून घेताना आधीच्या मंत्राचा संदर्भ घ्यायला हरकत नाही. जो ऐश्वर्याची कामना करतो त्याने आत्मज्ञानी चा आशिर्वाद घ्यावा असे म्हटले होते आता ह्या मंत्रात मुमुक्षू म्हणजे मुक्ती ची कामना करणाऱ्याला काय फळ मिळते ते सांगितले आहे. दोन्ही उदाहरणात आत्मज्ञानी एकच आहे पण साधकांमधे खूप फरक आहे.

नित्यानित्यवस्तुविवेकः।। विवेक-चूडामणि।। 19।।

दुसऱ्या प्रकारच्या साधकाला ब्रह्म नित्य आणि जगत मिथ्या (अनित्य) हे चांगले समजले आहे. त्याच बरोबर तो कामना रहीत, संपूर्ण विरक्त असा आहे. त्याला जीवनमरणाच्या चक्रातून मुक्ती हवी आहे. अशा व्यक्ती चे वर्णन धीराः म्हणजे विवेकी असे केले आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

तेजस्वी असे ब्रह्म धाम ज्यामधे हे विश्व स्थित आहे असे तो आत्मज्ञानी जाणतो. कामना रहीत व्यक्तीने जर अशा आत्मज्ञानी ची उपासना केली तर जीवनमरणाचा फेरा तो पार करतो.

---

**कामान् यः कामयते मन्यमानः स कामभिर्जायते तत्र तत्र। पर्याप्तकामस्य कृतात्मनस्तु इहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः ॥3.2.2।।**

यः मन्यमानः कामान् कामयते सः कामभिः तत्र तत्र जायते। पर्याप्तकामस्य कृतात्मनः सर्वे कामाः इह एव प्रविलीयन्ति ॥

यः जो यद् पु. प्र. ए. व.

मन्यमानः चिंतन करणारा मन् धातु +शानच्  प्रत्यय पु. प्र. ए. व.

कामान् कामना काम पु. द्वि. ब. व.

कामयते कामना करतो कामि धातु कर्तरि लट्लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

कामभिः कामनांनी काम पु. तृ. ब. व. आर्षरूपम्

तत्र तत्र तेथे तेथे अव्यय

जायते जन्मास येतो जन् धातु जुहोत्यादिः कर्मणि लट्लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

पर्याप्तकामस्य इच्छाआकांक्षा प्राप्त झालेला पर्याप्तकाम पु. ष. ए. व.

कृतात्मनः कृतकृत्य झालेला कृतात्मन् पु. प्र. ब. व.

सर्वे सर्व नपु. स. ए. व.

कामाः कामना काम पु. प्र. ब. व.

इह एव येथेच

प्रविलीयन्ति विलीन होतात प्र+वि+ली धातुः लट् लकार प्र.पु. ब.व.

ह्या मंत्रामधे अविज्ञे पासून आत्मज्ञानापर्यंतच्या  प्रवासाचे वर्णन केले आहे.

आपल्याला जड भारत (जड़ भरत) आणि हरणांची गोष्ट माहीत आहे.

आपल्या मनात आपण जे लक्ष्य ठेवलेले असते त्याच दिशेने आपण वाटचाल सुरू ठेवून आपले लक्ष्य प्राप्त केले जाते हा सर्वसाधारण व्यवस्थापनातील नियम. हाच नियम पुर्नजन्माच्या बाबत लागू होत असावा. संत ज्ञानेश्वरांनी "जो जे वांछील तो ते लाहो" असे म्हटले आहेच. थोडक्यात आपणच आपल्या पुनर्जन्माची दिशा ठरवत असतो. आपले ध्येय जर मोक्ष असेल तर मोक्ष सुद्धा आपल्या इच्छा नुसार मिळतो असे म्हणता येईल.

जशी जशी ज्ञानप्राप्ती होत जाईल तसे तसे कोणताच जन्म असू नये असे वाटू लागते. श्रीमद्भगवद्गीतेच्या 2र्या अध्यायातील 69 व्या श्लोकाची आठवण झाली.

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी।यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः।।2.69।।

ज्ञान म्हणजे तेज. ज्ञान म्हणजे प्रकाश. ज्ञानी व्यक्तीला निशा म्हणजे आत्मज्ञानाची संधी वाटते जेव्हा भोगी व्यक्तीसाठी तो निष्क्रियतेचा काळ असतो. (इच्छाभोगाची उपलब्धता नसते)

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

जो पुरुष आपल्या मनात इच्छाआकांक्षांची अपेक्षा ठेवतो त्याप्रमाणे तो पुन्हा पुन्हा जन्म घेतो. ज्याच्या सर्व कामना पूर्ण झाल्या आहेत, त्याच्या मनातील सर्व इच्छा विरून जातात.

---

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन।**

**यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥ 3.2.3**

अयम् आत्मा प्रवचनेन न लभ्यः न मेधया न बहुना श्रुतेन यम् एव एषः वृणुते। तेन लभ्यः तस्य एषः आत्मा स्वां तनुं विवृणुते ॥

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

प्रवचनेन प्रवचन पु. तृ. ए. व.

न अव्यय

लभ्यः मिळण्यासारखा  लभ्य पु. प्र. ए. व.

न अव्यय

मेधया बुद्धिने मेधा स्त्री. तृ. ए. व.

न अव्यय

बहुना श्रुतेन पुष्कळ वाचन बहु नपु. तृ. ए. व.

श्रुत नपु. तृ. ए. व.

यम् ज्याला यद् पु. द्वि. ए. व.

एव नक्की अव्यय

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

वृणुते निवडतो वृ धातु वरणे कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

तेन त्याच्या कडून तद् पु. तृ. ए. व.

लभ्यः प्राप्त केला जातो लभ्य पु. प्र. ए. व.

तस्य त्याचा तद् पु. ष. ए. व.

एषः हा  एतद् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

स्वां तनुं स्वस्वरूप

स्वा स्त्री. द्वि. ए. व.

तनु स्त्री. द्वि. ए. व.

विवृणुते प्रकट करतो वि+वृ धातु वरणे कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

कठोपनिषद्-1.2.23 मध्ये हाच मंत्र दिला आहे.

ह्या उपनिषदातील 1.1.4 आणि 1.1.5 ह्या मंत्रात परा आणि अपरा विद्या ह्यामधील फरक विस्ताराने सांगितला आहे. अपरा विद्या आपल्याला अध्यात्माचे मूलभूत ज्ञान नक्कीच देते,  अपरा विद्येच्या साह्याने आपल्या व्यक्तिमत्वाची पायाभरणी होते. पण एवढे पुरेसे नाही. अध्ययनापासून सत्यापर्यंत पोहोचणे ही सहज कृती नाही तर ती एक मोठीच तपश्चर्या आहे.

यम् एव एषः ह्या शब्दांचा दोन प्रकारे अर्थ वाचावयास मिळतो. जो साधक आत्म्याला प्राप्त करण्याची इच्छा करतो. किंवा ईश्वर ज्या साधकाची निवड करतो.

खरे तर इतके पवित्र प्रेम, इतकी तीव्र इच्छा असल्याशिवाय परमात्म्याशी एकरूप होताच येणार नाही.

तान्हया बाळाला भूक लागल्यावर आईची तीव्रतेने आठवण होणे आणि आपल्या बाळासाठी आईने हिरकणी होणे, दोन्ही गोष्टी इतक्या उत्कट आहेत की परमात्मा आपल्याला शोधतो की आपण परमात्म्याला ह्यामधे फरक शोधण्याची गरज सुद्धा नाही. ती फक्त एक जाणीव आहे. आणि ही आत्मज्ञानाची जाणीव बाहेरील ज्ञानाने मिळत नाही. थोडक्यात अध्यात्मिक ज्ञान जरी गुरूने दिले असले तरी परमात्म्याची ओळख आपण आपलीच करून घ्यावी लागते.

न ऋते श्रान्तस्य सख्याय देवाः। ऋग्वेद। 4.3.3.11।।

परीश्रम केल्याशिवाय ईश्वराचा सहवास लाभत नाही.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

हा आत्मा प्रवचने, मेधाशक्ती च्या साहयाने किंवा बहुश्रुत असल्याने प्राप्त होत नाही. जो त्याला प्राप्त करण्याची इच्छा धरतो त्यालाच त्याची प्राप्ती होते. त्यालाच आत्मा आपलें सत्य स्वरूप प्रकट करतो.

---

**नायमात्मा बलहीनेन लभ्यो न च प्रमादात् तपसो वाप्यलिङ्गात्।**

**एतैरुपायैर्यतते यस्तु विद्वांस्तस्यैष आत्मा विशते ब्रह्मधाम ॥ 3.2.4।।**

अयम् आत्मा बलहीनेन न लभ्यः प्रमादात् च न वा अपि अलिङ्गात् तपसः यः विद्वान् एतैः उपायैः यतते तस्य एषः आत्मा ब्रह्मधाम विशते ॥

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

बलहीनेन अशक्त बलहीन पु. तृ. ए. व.

न अव्यय

लभ्यः प्राप्त होतो लभ्य पु. प्र. ए. व.

प्रमादात् प्रमादाने प्रमाद पु. पं. ए. व.

च सुद्धा अव्यय

न अव्यय

वा किंवा अव्यय

अपि सुद्धा अव्यय

अलिङ्गात् अयोग्य अलिङ्ग पु. पं. ए. व.

तपसः तपाने तपस् नपु. पं. ए. व.

यः जो यद् पु. प्र. ए. व.

विद्वान् विद्वस् पु. प्र. ए. व.

एतैः या एतद् पु. तृ. ब. व.

उपायैः उपायांनी उपाय पु. तृ. ब. व.

यतते प्रयत्न करतो यत् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

तस्य त्याचा तद् पु. ष. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

ब्रह्मधाम ब्रह्मधामन् नपु. प्र. ए. व.

विशते प्रवेश करतो विश् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व. आर्षरूप

आधीच्या मंत्रात गुरू आणि इतर ज्ञानप्राप्तीची साधने आपल्याला मार्ग दाखवतात मात्र परमात्म्याची ओळख आपली आपणच करून घ्यावी लागते असे वाचले होते आता ह्या मंत्रात आत्मज्ञान होण्यासाठी आपली काय पात्रता असावी लागते ह्या संबंधी विवेचन केले आहे. हे वाचताना श्रीमद्भगवद्गीतेच्या ह्या श्लोकाची आठवण येते.

ह्या मंत्रात चार गुणांचे वर्णन केले आहे. जसे बल, अप्रमाद, तप आणि लिङ्ग. हे चार गुण तुमच्या कडे असतील तर आत्म्याची प्राप्ती शक्य आहे. येथे बल म्हणजे आत्मनिष्ठा, किंवा नैतिक बळ. अष्टांग योगातील आठ नियमांचे पालन म्हणजे परमात्म्याशी जोडून घेण्याची पूर्वतयारी. लिङ्ग म्हणजे संकेत किंवा प्रतिक. आदि शंकराचार्यांनी त्याला संन्यास असे म्हटले आहे. संन्यासी जो ज्ञानी आहे.

ह्या मंत्रात असे म्हटले आहे की आत्मा बलहीनांकडून प्राप्त केला जात नाही. तसेच तो प्रमादी आणि अयोग्य पद्धतीने तपाचरण करणाऱ्यांनाही प्राप्त होत नाही. जे (योग्य) उपायांनी प्रयत्न करतात अशा विवेकी पुरुषांना ब्रह्मधाम प्राप्त होते.

---

**संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्ताः ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाविशन्ति ॥3.2.5।।**

एनम् सम्प्राप्य ऋषयः ज्ञानतृप्ताः कृतात्मानः वीतरागाः प्रशान्ताः ते युक्तात्मानः धीराः सर्वगम् सर्वतः प्राप्य सर्वम् एव आविशन्ति ॥

एनम् याला एतद् पु. द्वि. ए. व.

सम्प्राप्य प्राप्त केल्यानंतर सम+प्र+आप् धातु + ल्यप् प्रत्यय

ऋषयः ऋषि पु. प्र. ब. व.

ज्ञानतृप्ताः ज्ञानतृप्त पु. प्र. ब. व.

कृतात्मानः कृतकृत्य कृतात्मान् पु. प्र. ब. व.

वीतरागाः कामना रहीत वीतराग पु. प्र. ब. व.

प्रशान्ताः प्रगाढ शांती प्रशान्त पु. प्र. ब. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

युक्तात्मानः युक्त होऊन युक्तात्मन् पु. प्र. ब. व.

धीराः विवेकी पुरुष धीर पु. प्र. ब. व.

सर्वगम् सर्व व्यापी सर्वग पु. द्वि. ए. व.

सर्वतः सर्वत्र सर्वत् पु. द्वि. ब. व.

प्राप्य प्राप्त करून प्र+आप् धातु + ल्यप् प्रत्यय

सर्वम् सर्वामधे सर्व नपु. प्र. ए. व.

एव नक्की अव्यय

आविशन्ति प्रवेश करतात आङ्+विश् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

आधीच्या मंत्रात उल्लेख केलेल्या ब्रह्मधाम मध्ये प्रवेश करताना साधकाच्या मानसिक स्थितीचे वर्णन ह्या मंत्रात केले आहे.

धर्म, अर्थ, काम, आणि मोक्ष यांना 'पुरुषार्थ चतुष्टय' असे म्हणतात. त्यापैकी धर्म अर्थ काम यांची फळे अनित्य आहेत. कारण

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति | 9.21

स्वर्गलोकात पुण्याची फळे चाखून झाली की पुन्हा मर्त्य लोकात यावे लागते.

मोक्षाचे तसे नाही. मोक्ष शाश्वत आहे. परमात्म्याशी जोडून घेतल्यानंतर परमात्मा होण्याची अनुभूती म्हणजेच सर्वव्यापी होण्याची अनुभूती.

'बुद्धि: कर्मानुसारिणी' ह्या उक्ती प्रमाणे जे काही ज्ञातव्य होते ते सर्व काही ज्ञात करून घेतले पण त्याचा अभिमान वाटत नाहीये तर अहंकारशून्य अशी स्थिती आहे. आतापर्यंत केलेल्या प्रयासाचे फळ मिळाल्याने अत्यंत कृतकृत्य वाटते आहे. कोणतीच इच्छा शिल्लक राहिलेली नाही. श्रीमद्भगवद्गीतेच्या 7.29 व्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे शारीरिक पीडा सुद्धा जाणवत नाहीये. संचित कर्मे संपून गेली आहेत असे सुद्धा म्हणता येईल.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

आत्म्याची प्राप्ती झालेले ऋषीगण त्या ज्ञानाने तृप्त होतात, कृतकृत्य असे ते कामना रहीत, प्रगाढ शांती लाभलेले, विवेकी, सर्वव्यापी आत्मतत्वाशी युक्त होऊन ब्रह्मतत्त्वातच प्रवेश करतात.

---

**वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः। ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥3.2.6।।**

वेदान्तविज्ञान सुनिश्चितार्थाः सन्न्यासयोगात् शुद्धसत्त्वाः ते सर्वे यतयः परान्तकाले ब्रह्मलोकेषु परामृताः परिमुच्यन्ति ॥

वेदान्तविज्ञान वेदान्ताचे ज्ञान

सुनिश्चितार्थाः संदिग्धपणे सु+निश्चित +अर्थ पु. प्र. ब. व.

सन्न्यासयोगात् संन्यासयोगामुळे सन्न्यासयोग पु. पं. ए. व.

शुद्धसत्त्वाः शुद्ध झालेले शुद्धसत्त्व पु. प्र. ब. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

यतयः प्रयत्नशील यति स्त्री. प्र. ब. व.

परान्तकाले अंतिम समयी परान्तकाल पु. स. ए. व.

ब्रह्मलोकेषु ब्रह्मलोकात ब्रह्मलोक पु. स. ब. व.

परामृताः अमृतत्व जाणणारे पर+अमृता स्त्री. प. ब. व.

परिमुच्यन्ति मुक्त होतात परि+मुच् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

आत्म्याला प्राप्त करून घेतल्यानंतर काय घडते त्याचे वर्णन ह्या मंत्रात केले आहे.

हाच मंत्र कैवल्योपनिषद् 4 येथे सुद्धा सापडतो. सन्न्यासयोग असा शब्द येथे वापरला आहे. त्याचा अर्थ केवळ संन्यासी होणे असा नसून वेदान्ताचे ज्ञान आणि ज्ञानामुळे येणारी मानसिक शुद्धता आणि पवित्रता आणि सर्व वासनांचा लोप.

वेदान्त विज्ञान म्हणजे उपनिषदांचे निश्चितपणे झालेले ज्ञान. परान्तकाल म्हणजे केवळ मृत्यू असा अर्थ नसावा तर सर्व वाईट गोष्टींचा अन्त आणि परामृत म्हणजे सर्वोच्च अमरता.

ह्या मंत्रात असे म्हटले आहे की

उपनिषदांचे विज्ञान सुनिश्चित पणे जाणून घेऊन संन्यासयोगाने मन शुद्ध करून ते ब्रह्मलोकास प्राप्त होतात तसेच श्रेष्ठ अमृतत्व प्राप्त करून सर्वार्थाने मुक्त होतात.

---

**गताः कलाः पञ्चदश प्रतिष्ठा देवाश्च सर्वे प्रतिदेवतासु।**

**कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा परेऽव्यये सर्वे एकीभवन्ति ॥3.2.7।।**

पञ्चदश कलाः प्रतिष्ठाः गताः सर्वे देवाः च प्रतिदेवतासु कर्माणि विज्ञानमयः आत्मा च सर्व परे अव्यये एकीभवन्ति ॥

पञ्चदश पंधरा

कलाः कल स्त्री. द्वि . ब. व.

प्रतिष्ठाः प्रतिष्ठा स्त्री. द्वि . ब. व.

गताः प्रवेशतात गम् धातु क्त प्रत्यय स्त्री. द्वि . ब. व.

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

देवाः देव पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

प्रतिदेवतासु प्रतिदेवतांमधे प्रतिदेवता पु. स. ब. व.

कर्माणि कर्मे कर्मन् नपु. प्र. ब. व.

विज्ञानमयः बुद्धिने विज्ञानमय पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

परे श्रेष्ठ पर पु. प्र. ब. व.

अव्यये अविनाशी अव्यय

परे अव्यये श्रेष्ठ ब्रह्म

एकीभवन्ति एकरूप होतात एकी+भू धातु होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

ह्या मंत्रात मोक्ष मिळाला असता कोणकोणती तत्वे परमात्म्यात विलीन होतात ते सांगण्यासाठी पंधरा कलांचा उल्लेख केला आहे. प्रश्नोपनिषदाच्या 6 व्या मंत्रात सोळा कलांचा उल्लेख केला आहे. चंद्राच्या कला सुद्धा सोळाच. त्यापैकी अमावास्या अज्ञानाचे प्रतीक आहे तर पौर्णिमा पूर्ण ज्ञानाचे.

प्रश्नोपनिषदात सांगितलेल्या 16 कलांची नावे

1. प्राण, 2. श्रद्धा (सत्यावर विश्वास), 3.आकाश, 4. वायु, 5. अग्नि, 6.जल, 7.पृथ्वी, 8. इंद्रिय, 9. मन अर्थात् ज्ञान, 10 अन्न, 11. वीर्य अर्थात बळ, 12. तप अर्थात् धर्मानुष्ठान सत्याचा, 13.मंत्र अर्थात् वेदविद्या, 14.कर्म, 15.जग, 16. नाम (ओळख).

यापैकी शेवटची कला म्हणजे 'नाम' आपल्या कर्मानुसार ठरते. बाकी सर्व कला कर्मा शिवाय घडलेल्या असतात. प्राण श्रीभगवान विष्णू निर्माण करतात, त्यापासून श्रद्धा निर्माण होते. बाकीच्या कलांच्या आपापल्या देवता आहेत.  ह्या मंत्रात प्रतिष्ठा असा शब्द वापरला आहे त्याचा अर्थ प्रति स्थित, प्रत्येकात वास करणारा. ह्या सर्व 16 कला माणसाकडे असतात फक्त त्याला त्याची जाणीव नसते. समष्टी पातळीवरचे प्राण यष्टी रूपात प्रत्येक व्यक्तीमधे दिसते. मृत्यू समयी आत्मसाक्षात्कारी पुरुषाची सर्व कर्मे आणि कर्मफळे त्या अविनाशी तत्त्वात विलीन होतात, मागे राहते ते फक्त त्याचे नाव. अशा प्रकारे शरीर आणि आत्मा एकमेकांपासून विलग होतात.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

मृत्यू समयी पंधरा कला आपापल्या मूळ स्थितीत परततात. इन्द्रियांचे (आणि पंचमहाभूतांचे) देव त्यांच्या मूळ देवतांना जाऊन मिळतात. सर्व कर्मे आणि ज्ञानी, साक्षात्कारी आत्मा परमश्रेष्ठ ब्रह्माशी एकरूप होतात..

---

**यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय।**

**तथा विद्वान् नामरूपाद् विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥3.2.8।।**

यथा स्यन्दमानाः नद्यः नामरूपे विहाय समुद्रे अस्तम् गच्छन्ति तथा विद्वान् नामरूपात् विमुक्तः परात्परम् दिव्यम् पुरुषम् उपैति ॥

यथा जसे अव्यय

स्यन्दमानाः वाहणाऱ्या स्यन्द धातु वाहणे +शानच् प्रत्यय स्त्री. प्र. ब. व.

नद्यः नद्या नदी स्त्री. प्र. ब. व.

नामरूपे नाव आणि बाह्य रूप नामरूप नपु. प्र. द्वि. व.

विहाय सोडून वि + हा धातु त्याग करणे ल्यप् प्रत्यय

समुद्रे समुद्रात समुद्र पु. स. ए. व.

अस्तम् अस्त नपु. प्र. ए. व.

गच्छन्ति जातात गम् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

तथा तसे अव्यय

विद्वान् विद्वस् पु. प्र. ए. व.

नामरूपात् नामरूपापासून नामरूप नपु. पं. ए. व.

विमुक्तः विभक्त वि+मुच् धातु क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

परात्परम् श्रेष्ठाहून श्रेष्ठ परात्पर पु. द्वि . ए. व.

दिव्यम् दिव्य पु. द्वि . ए. व.

पुरुषम् पुरूषास पुरुष पु. द्वि . ए. व.

उपैति प्राप्त होतात उप + इ धातु जाणे कर्तरि लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

प्रश्नोपनिषदातील सोळा कलांपैकी शेवटची म्हणजे कला नाम म्हणजे नाव . जे त्या व्यक्तीच्या जाण्यानंतर मागे राहते. पण ह्या उपनिषदातील आधीच्या मंत्रात केवळ 15 कलांचाच उल्लेख केला

आहे. ह्या सर्व कलांची 'एकीभवन्ति' म्हणजे त्या सर्वांचा विलय होतो असे म्हटले आहे. आता ह्या मंत्रात त्या पुढचा विचार मांडला आहे. त्यासाठी नदी च्या समुद्राला मिळण्याची उपमा दिली आहे. आपण नदी ला तिच्या वैशिष्ट्यांमुळे ओळखतो, नदीला नाव सुद्धा असते. जेव्हा नदी समुद्रास मिळते, तेव्हा तिचे जलतत्व तसेच राहते मात्र तिला समुद्रापासून वेगळे करता येत नाही. म्हणजेच तिचे नाम आणि रूप यांचा लोप होतो. अशी देवत्व प्राप्त झालेल्या व्यक्ती दिसून येतात.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ज्याप्रमाणे वाहणाऱ्या नद्या समुद्राला जाऊन मिळाल्या की त्यांच्या नाव आणि रूपाचा लोप होतो, त्याचप्रमाणे ज्ञानी पुरूष नामरूपापासून मुक्त होऊन अव्यक्त श्रेष्ठतम पुरूषास प्राप्त होतो.

---

**स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति। तरति शोकं तरति पाप्मानं गुहाग्रन्थिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति ॥3.2.9॥**

यः जो यद् पु. प्र. ए. व.

ह वै खरोखर निपात अव्यय

तत् ते  तद् नपु. प्र. ए. व.

परमम् श्रेष्ठ परम नपु. प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

वेद जाणतो विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

ब्रह्म एव ब्रह्मच

ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

एव नक्की अव्यय

भवति होतो भू धातु होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

अस्य त्याच्या इदम् नपु. ष. ए. व.

कुले कुळात कुल नपु. स. ए. व.

अब्रह्मवित् ब्रह्म न जाणणारा अ+ब्रह्मविद् नपु. प्र. ए. व.

न अव्यय

भवति होतो भू धातु होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

शोकम् दुःख शोक पु. द्वि. ए. व.

तरति पार करतो तृ धातु कर्तरि लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

पाप्मानम् पापांना पाप्मन् पु. द्वि. ए. व.

तरति पार करतो तृ धातु कर्तरि लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

गुहाग्रन्थिभ्यः हृदयस्थ ग्रंथी पासून गुहाग्रन्थिन् नपु. पं. ब. व.

विमुक्तः मुक्त वि+मुच् धातु क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

अमृतः अमृत पु. प्र. ए. व.

भवति होतो भू धातु होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

आतापर्यंत आपण ब्रह्मप्राप्ती झाली असता काय काय घडते ते वाचले. आता ह्या मंत्रात ब्रह्मप्राप्तीची मिळणारी तीन प्रकारची फळे सांगितली आहेत. ह्या उपनिषदात ज्ञानप्राप्ती चे महत्त्व पुन्हा पुन्हा विशद केले आहे. आपल्या रोजच्या आयुष्यात सुद्धा अचूक ज्ञान फार महत्वाची भूमिका बजावते. ह्या मंत्रातील हृदयग्रन्थी ह्या शब्दाचा अर्थ आपण 2.2.8 ह्या मंत्रात वाचला होता. त्यालाच 2.1.8 ह्या मंत्रात अविद्याग्रन्थी असे म्हटले आहे. राग द्वेष आसूया तिरस्कार कामवासना इच्छाआकांक्षा अशा सर्व गाठी ज्ञानप्राप्ती मुळे तुटून पडतात. एखादा विषय जाणणाऱ्याला आपण त्या विषयातील तज्ञ असे म्हणतो पण येथे ब्रह्म जाणणाऱ्याला तोच ब्रह्म होतो असे म्हटले आहे. ज्ञानप्राप्ती म्हणजे जणू काही परीस स्पर्श.

यदग्ने स्यामहं त्वं त्वं वा घा स्या अहम् । स्युष्टे सत्या इहाशिषः ॥ (ऋग्वेद 8.44.23।।

हे प्रभू मी आपण होईन आणि आपण मी होऊन जावे. मी - आपण असा काही फरक राहणारच नाही.

वडिलांचे ज्ञान आणि त्यांच्या कडे असणारी कला मुलांमध्ये सुद्धा असते कारण त्यांनी ते सर्व लहानपणापासून पाहिलेले असते. असाच काहीसा मुद्दा ह्या मंत्रात मांडला आहे. सुसंस्कृत घरातील मुले  सुसंस्कृत असण्याची शक्यता जास्त असते. साधक जर स्वतः च ब्रह्म झाला असेल तर त्याच्या कडे सर्व नकारात्मक गोष्टींवर मात करण्याची पात्रता असणारच.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

जो त्या ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो. त्याच्या कुळामधे ब्रह्म न जाणणारा असा कोणी जन्माला येत नाही. तो दुःख तरून जातो, पाप तरून जातो, हृदयातील गाठी पासून मुक्ती मिळवून अमृतस्वरूप होतो.

---

**तदेतदृचाऽभ्युक्तम् -- क्रियावन्तः श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठाः स्वयं जुह्वत् एकर्षिं श्रद्धयन्तः।**

**तेषामेवैषां ब्रह्मविद्यां वदेत शिरोव्रतं विधिवद्यैस्तु चीर्णम् ॥ 3.2.10।।**

तत् एतत् ऋचा अभ्युक्तम्। क्रियावन्तः श्रोत्रियाः ब्रह्मनिष्ठाः श्रद्धयन्तः एकर्षिम् स्वयं जुह्वते विधिवत यैः तु शिरोव्रतम् चीर्णम् तेषाम् एव एषाम् ब्रह्मविद्याम् वदेत ॥

तत् ती तद् नपु. प्र. ए. व.

एतत् ही एतद् नपु. प्र. ए. व.

ऋचा ऋचेने ऋच् स्त्री. तृ. ए. व.

अभ्युक्तम् सांगितले आहे अभि+वच् धातु बोलणे + क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

क्रियावन्तः कर्म करणारे क्रियावत् पु. प्र. ब. व.

श्रोत्रियाः वेदाभ्यास केलेले

ब्रह्मनिष्ठाः ब्रह्माचे सतत चिंतन करणारे ब्रह्मनिष्ठा स्त्री.. ब. व.

श्रद्धयन्तः श्रद्धाळू श्रद्धयत् पु. प्र. ब. व.

एकर्षिम् एकर्षि नामक अग्नी एकर्षि पु. द्वि. ए. व.

स्वयं स्वतः सु + अय् धातु जाणे + अच् प्रत्यय नपु. प्र. ए. व.

जुह्वते हवन करतात हु धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

जुह्वत् हु धातु +शतृँ प्रत्यय

विधिवत शास्त्रोक्त

यैः ज्यांच्याकडून यद् नपु. तृ. ब. व.

तु परन्तु अव्यय

शिरोव्रतम् मस्तकावर अग्नी धारण करण्याचे व्रत शिरोव्रत नपु. प्र. ए. व.

चीर्णम् आचरले जाते चीर्ण नपु. प्र. ए. व.

चर् धातु नक् प्रत्यय

तेषाम् त्यांना तद् नपु. ष. ब. व.

एव नक्की अव्यय

एषाम् ही इदम् नपु. ष. ब. व.

ब्रह्मविद्याम् ब्रह्मविद्या स्त्री. द्वि. ए. व.

वदेत सांगावी वद् धातु कर्तरि विधिलिङ् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

ह्या उपनिषदाचे अध्ययन फलदायी होण्यासाठी आवश्यक असणाऱ्या गुणवत्तेसंबंधी ह्या मंत्रात विवेचन केले आहे. ह्या मध्ये असलेल्या विविध विशेषणांचा अर्थ शब्दशः न घेता प्रतिकात्मक घ्यायला हवा. जसे शिरोव्रत म्हणजे डोक्यावर अग्नी ठेवणे नसून ज्ञान मिळवण्यासाठी ज्वलंत धडपड. ह्या उपनिषदाचे नावच मुण्डकोपनिषद् असे आहे. शरीरातील सर्वात महत्त्वाचा अवयव म्हणजे मस्तक. ब्रह्मविद्येचे महत्त्व पटवून देणारे हे महत्वाचे उपनिषद् होय. एकर्षि म्हणजे अग्नी. एकर्षि म्हणजे एकमेव, द्रष्टा. ईशावास्योपनिषदातील 16 व्या मंत्रात सूर्याला उद्देशून असे म्हटले आहे.

ब्रह्मविद्या मिळणे म्हणजे आयुष्यातील सर्वोच्च लक्ष्य साध्य करणे त्यासाठी दुर्दम्य इच्छाशक्ती, निष्ठा, श्रद्धा आणि कष्ट घेण्याची तयारी हवीच. 'स्वयं जुह्वते' असा समर्पक शब्द येथे वापरला आहे. सर्वसामान्यांच्या आयुष्यात अर्थ, काम आणि धर्म हेच पुरूषार्थ असतात. ज्याला ब्रह्मविद्या समजली म्हणजे जो श्रोत्रिय आहे तो मुमुक्षू असतो. तो क्रियावंत म्हणजे कर्मयोगी आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ऋचांमधे हेच सांगितले आहे की जे शास्त्रोक्त कर्मे करतात, वेदांचे अध्ययन करतात, एकर्षि नामक अग्नी मधे स्वतः हवन करतात(स्वतः कष्ट घेतात) ते ब्रह्मनिष्ठ आणि श्रद्धाळू आहेत, शिरोव्रताचे काटेकोर पालन करतात, त्यांनाच ही ब्रह्मविद्या शिकवावी.

---

**तदेतत् सत्यमृषिरङ्गिराः पुरोवाच नैतदचीर्णव्रतोऽधीते। नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ॥3.2.11॥**

तद् एतत् सत्यम् ऋषिः अङ्गिराः पुरा उवाच। अचीर्णव्रतः एतद् न अधीते। नमः परमऋषिभ्यः नमः परमऋषिभ्यः ॥

तत् ते तद् नपु. द्वि . ए. व.

एतत् हे एतद् नपु. द्वि . ए. व.

सत्यम् सत्य नपु. द्वि . ए. व.

ऋषिः ऋषि पु. प्र. ए. व.

अङ्गिराः अङ्गिरा ऋषी

पुरा पूर्वी पुरा स्त्री. प्र. ए. व.

उवाच म्हणाले ब्रू धातु कर्तरि लिट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

अचीर्णव्रतः व्रताचे आचरण न करता अचीर्णव्रत पु. प्र. ए. व.

एतद् हे एतद् नपु. प्र. ए. व.

न अव्यय

अधीते अभ्यास करतात अधि + इ धातु अध्ययन करणे कर्तरि  लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

नमः नमस् नपु. प्र. ए. व.

परमऋषिभ्यः श्रेष्ठ ऋषींना परमऋषि पु. च. ब. व.

नमः नमस्कार नमस् नपु. प्र. ए. व.

परमऋषिभ्यः परमऋषि पु. च. ब. व.

मुण्डकोपनिषदातील सर्वात पहिल्या दोन मंत्रात स्वतः ब्रह्मदेवांनी ब्रह्मविद्या आपला जेष्ठ पुत्र अथर्वास सांगितली आणि त्यानंतर गुरू शिष्य परंपरेस सुरवात झाली. त्यानंतर तिसऱ्या मंत्रात शौनकाने अंगिरा ऋषींना प्रश्न विचारल्यानंतर पूर्ण तीन मुण्डकांची श्रुती निर्माण झाली,असे आपण पाहिले. आता ह्या मंत्राने मुण्डकोपनिषदाची सांगता होणार आहे. आधीच्या मंत्रात सांगितलेल्या उपदेशाचा पुनरूच्चार ह्या मंत्रात परत केलेला दिसतो आहे. मात्र हा मंत्र नक्की कोणी लिहिला आहे असा प्रश्न पडतो.

भारतीय तत्वज्ञानाचे भांडार सर्वांसाठी खुले आहे, त्यामध्ये जातीधर्माचा भेदभाव कधीच नव्हता. मात्र विद्या ग्रहण करणाऱ्या व्यक्तीसाठी काही आचरणाचे नियम आणि व्रते सांगितलेली दिसतात जे सर्व आपण आधीच्या मंत्रात वाचले. ज्या साधकाला नित्य आणि अनित्य ह्यामधील फरक उमजून आला आहे आणि त्याला शाश्वत आनंद प्राप्ती ची ओढ लागली आहे. ते ज्ञान मिळवण्यासाठी सर्व प्रकारचे कष्ट घेण्याची त्याची तयारी आहे त्याला अध्ययन करण्याचा अधिकार आहे.

'तेच हे सत्य' असे गुरू आपल्या शिष्यांना सांगत आहेत. जे अंगिरा ऋषींनी शौनकाला सांगितले.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

'तेच हे सत्य आहे ' पूर्वी अंगिरा ऋषींनी सांगितले. जो व्रतांचे पालन करत नाही तो अध्ययन करण्याचा अधिकारी नाही. परमश्रेष्ठ ऋषींना आमचा नमस्कार. परमश्रेष्ठ ऋषींना आमचा नमस्कार.

------------🙏🙏🙏🙏🙏🙏------------------------------

इति  अनघा